

नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)




महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com





# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६० वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळयांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदान-प्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित-वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता' पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयातील ग्रंथालयात अद्ययावत् पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयातून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांना आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रू. ४००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

– संपादक मंडळ

# लेखकांस आवाहन

*नवभारत मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण नवभारताकडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी अशी विनंती आहे.*

*१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.*

*२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यासह द्यावेत.*

*३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही याची स्पष्ट कल्पना नवभारतच्या संपादकांना द्यावी.*

*४. नवभारतमध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात नवभारतमध्ये येईल किंवा येणार नाही हे यथावकाश कळविले जाईल याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.*

*आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.*

*- संपादक मंडळ*

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६८। अंक २। नोव्हेंबर २०१४
कार्तिक/मार्गशीर्ष शके १९३६
वार्षिक वर्गणी ४०० रूपये
या अंकाची किंमत रू. ३०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
नीता गायकवाड
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.



अनुक्रमणिका






# नवभारत

## नोव्हेंबर २०१४

## अनुक्रमणिका

## संपादकीय

यंदाच्या वर्षी स्वतंत्र भारताचे पहिले पंतप्रधान जवाहरलाल नेहरू यांची प्रकर्षाने आठवण यावी व त्यांना श्रद्धांजली वाहावी यांची दोन कारणे आहेत. २७ मे रोजी नेहरूंच्या मृत्यूला ५० वर्षे झाली व आता १४ नोव्हेंबरला त्यांच्या जन्माला १२५ वर्षे पुरी होत आहेत. 'नवभारता'ने मे २०१४ चा अंक नेहरू-विशेषांक म्हणून प्रसिद्ध केला. तथापि, नेहरूंचे व्यक्तिमत्त्व व कर्तृत्व या दोन्हींनाही इतके विविध व आकर्षक पैलू होते की, त्या साऱ्यांचा आढावा तेवढ्या एका अंकात घेणे शक्य झाले नाही. त्या वेळीच आम्ही जाहीर केले होते की, नोव्हेंबरचा अंकही नेहरू-विशेषांक म्हणून काढला जाईल. त्याप्रमाणे प्रस्तुत अंक प्रसिद्ध करीत आहोत.

भारताचे पहिले पंतप्रधान म्हणून जवाहरलाल नेहरूंनी कारभार हाती घेतला, तेव्हा परिस्थिती फार बिकट होती. फाळणी होऊन स्वातंत्र्य मिळाले व देशात हिंदू-मुसलमानांच्या दंगलींचा धुमाकूळ सुरू झाला. पश्चिम पाकिस्तानातून निर्वासितांचे लोंढे पूर्व पंजाब व दिल्ली या भागात आले. त्याच वेळी पूर्व पंजाबातून अनेक मुसलमानांनी पाकिस्तानात स्थलांतर केले. निर्वासितांची व्यवस्था लावण्याची जबाबदारी अवघड होती. त्यांच्या मोठ्या वसाहती तयार कराव्या लागल्या. इंग्रज सरकारच्या सार्वभौमत्वाखाली आणि संरक्षणाखाली लहान-मोठी पाचशेहून अधिक संस्थाने नांदत होती. हिंदुस्थानला स्वातंत्र्य देणाऱ्या कायद्याने या संस्थानिकांना स्वातंत्र्य दिले होते. ही संस्थाने भारत किंवा पाकिस्तानात विलीन होऊ शकत होती किंवा स्वतंत्रही राहू शकत होती. तिसरा प्रश्न होता भारताच्या परराष्ट्रीय धोरणांची दिशा ठरविण्याचा. दुसऱ्या महायुद्धानंतर जगातील बहुसंख्य राष्ट्रे पाश्चात्त्यांचा गट आणि सोव्हिएट युनियनचा गट अशा दोन गटांत विभागली गेली होती. त्याच वेळी जगातील शांतता टिकविण्यासाठी संयुक्त राष्ट्र संघाची स्थापना झाली होती. ब्रिटिश साम्राज्यापासून स्वतंत्र झालेल्या किंवा वसाहतीचे स्वातंत्र्य स्वीकारलेल्या देशांचा 'ब्रिटिश कॉमनवेल्थ' नावाचा गट स्थापन करण्याची ब्रिटिश राज्यकर्त्यांची खटपट होती. या परिस्थितीत भारताने 'कॉमनवेल्थ'चे सभासदत्व तर स्वीकारले; पण गटनिरपेक्षतेची स्वतंत्र भूमिकाही ठरवून घेतली. जागतिक शांततेचे रक्षण करणे, हे ध्येय ठरवले आणि त्यासाठी संयुक्त-राष्ट्र-संघाला अधिक प्रतिष्ठा मिळावी यासाठी प्रयत्न केले.

दारिद्र्य, अज्ञान, निरक्षरता हे प्रश्न विक्राळ स्वरूप घेऊन उभे होते. अन्नधान्याची उपज पुरेशी नव्हती. परदेशातून धान्याची आयात करावी लागत होती. देशात उद्योगधंदे अतिशय अल्प प्रमाणात होते. पोलाद, सिमेंट, वीज इत्यादींचे उत्पादन अगदीच कमी होते. चांगले रस्ते नव्हते. रेल्वेचे जाळे इंग्रजांच्या लष्करी वाहतुकीला उपयोगी असे तयार झाले होते. माल-वाहतूक व यात्री-वाहतूक या सोयी दुर्लक्षिल्या गेल्या होत्या. या सर्वांचा एकत्रित विचार करून सर्वांगीण विकासाची योजना आखायला हवी होती.

भारताच्या नागरिकांचे जीवन अनेक समस्यांनी गांजलेले होते. सरासरी आयुर्मान फक्त ३२ वर्षांचे होते. आरोग्याच्या सोयी नव्हत्याच. साहजिकच बहुतेक नागरिक झाडपाल्यांची औषधे अगर पंचतंत्र करणारे बुवा यांच्या नादाला लागत. शिक्षणाच्या सोयी अगदीच तुटपुंज्या होत्या. प्राथमिक शाळेत पोचण्यासाठी मुलांना किमान दोन मैलांचे अंतर पार करावे लागे. माध्यमिक शाळेत जावयाचे तर तालुक्याच्या गावाला जाऊन राहावे लागे. उच्च शिक्षण घेण्याची संधी शंभरांतील एखाद्याला लाभे. वस्त्र-पात्र आणि निवारा यांचीही वानवा होती. सारांश, जीवनाची गुणवत्ता रसातळाला पोचली होती.

नेहरूंनी साठ वर्षांपूर्वी जे निर्णय घेतले, ते कोणत्या परिस्थितीत घेतले याचे भान आपण कायम ठेवले पाहिजे. त्यांना कोणते पर्याय उपलब्ध होते त्यांची मांडणी केली पाहिजे. मगच त्यांनी जी धोरणे ठरविली ती योग्य होती की नाही, याचे यथार्थ आकलन आपणास होऊ शकेल. त्याच दृष्टिकोणातून मे २०१४ व आता नोव्हेंबर २०१४ या अंकातील लेखांची निवड केली आहे.

दोन लेख उशिरा आल्याने या अंकात घेता आले नाहीत. ते नंतर प्रसिद्ध करू.

अनुक्रमणिका

# नेहरूंच्या राजवटीतील शिक्षण

श्री. मा. भावे

स्वातंत्र्य मिळण्याच्या सुमारास माझ्या पिढीतील व्यक्तींनी शाळेत प्रवेश घेतला आणि नेहरूंचा मृत्यू झाला त्याच्या आसपास आम्ही शिक्षण पुरे केले. नेहरूंची पंतप्रधान म्हणून झालेली कारकिर्द आणि माझ्या पिढीचा शैक्षणिक कालखंड हे एकच होते. आमच्या कळत्या आयुष्याला सुरुवात झाली तेव्हापासून आम्ही नेहरूंना पंतप्रधान म्हणूनच ओळखत आलो. आमच्या विचारांवर, आयुष्यक्रमावर, आजूबाजूच्या घडामोडींकडे पाहण्याच्या आमच्या दृष्टिकोणावर नेहरूंच्या काळाची, त्यांच्या विचार करण्याच्या पद्धतीची व त्यांच्या राजकारण करण्याच्या शैलीची अमिट छाप पडली आहे.

आमच्यापैकी बहुसंख्य लोकांच्या लेखी नेहरू व पंतप्रधानपद या दोन गोष्टी अविभाज्य होत्या. नेहरूंखेरीज दुसरी कोणी व्यक्ती पंतप्रधान होऊ शकते, हे आमच्या कल्पनेच्या बाहेर होते. स्वातंत्र्यलढ्यातली त्यांची उज्ज्वल कामगिरी, सोसलेले दीर्घ कारावास, त्यांना लाभलेला गांधीजींचा वारसा, नेहरूकुटुंबाने देशासाठी केलेला अतुल त्याग यांचे अनोखे व तेजःपुंज वलय नेहरूंच्या भोवती होते. नेहरूंइतके आकर्षक, प्रभावी व लोभस व्यक्तित्व तर कोणत्याच समकालीन नेत्याच्या ठिकाणी नव्हते. पिकलेल्या हापूसच्या आंब्यासारखी त्यांची अंगकांती होती. अतिशय सुरेख नाक होते. स्वच्छ नजर होती. विशाल कपाळ होते. उंची व अंगयष्टी यांचा डौलदार मेळ शरीरावर दिसून येत असे. त्यांच्या दिलखुलास व निर्मळ हास्याचे कौतुक सर्वांकडूनच होत असे. शुभ्र, स्वच्छ, बिनसुरकुतलेले कपडे, डोक्यावरची घडीदार व नेमक्या कोनात बसवलेली टोपी पाहिली की, हा मनुष्य निर्मळ व विवेकी आहे, असा ठसा मनावर उमटत असे. कपट, किल्मिष, द्वेष, मत्सर, आपमतलबीपणा अशा कुरूप भावनांचा स्पर्शही या अलौकिक पुरुषाच्या मनाला होत नसावा, असे वाटत राही. अशा थोर मनुष्याच्या छत्रछायेखाली आपण मोठे होत आहोत हे आपले भाग्य आहे, असा दिलासा वाटे.

नेहरूंच्या सार्वजनिक कार्याची आदबही त्यांच्या रुबाबाला शोभणारी असे. कोणा व्यक्तीवर तिचे नाव घेऊन तिचे चारित्र्यहनन होईल अशी टीका त्यांनी कधी केली नाही. त्यांनी आयुष्यात शेकडो वार्ताहर-परिषदा घेतल्या व व्यक्तिगत मुलाखतीही दिल्या; पण 'मी असे बोललोच नाही' किंवा 'माझ्या म्हणण्याचा वेगळाच अर्थ लावला' असे खुलासे करण्याची पाळी त्यांच्यावर कधी आली नाही. राजकारणात राहूनही त्यातील धुळवडीचा ठिपकाही त्यांच्या अंगावर उडाला नाही. या त्यांच्या निष्कलंक राजकारणशैलीचे अपार आकर्षण सर्वांना वाटत असे.

नवीन स्वतंत्र राष्ट्राची उभारणी श्रेष्ठ तत्त्वांच्या पायावर व्हावी यासाठी नेहरू कसोशीचे प्रयत्न करत राहिले. त्यांनी धर्मनिरपेक्ष लोकशाहीच्या तत्त्वावर आधारलेली घटना तयार केली. नियोजनबद्ध विकासासाठी नियोजन-मंडळाची स्थापना केली. आर्थिक विकास होताना तळागाळाच्या लोकांपर्यंत त्या विकासाचे परिणाम दिसले पाहिजेत, याचा आग्रह धरला. परंपरापूत व गतानुगतिक समाजावर विज्ञाननिष्ठेचे संस्कार व्हावेत, अशी तळमळ बाळगली. दोन गटांत विभागलेल्या त्या काळच्या जगात दोन्ही गटांना भारताच्या भूमिकेविषयी संशय वाटेल, ही जोखीम पतकरूनही नेहरूंनी अलिप्ततावादाचा अंगीकार केला व त्या धोरणातूनच दोघांनीही भारताच्या शिष्टाईची अपेक्षा बाळगावी इतकी मान्यता मिळवून घेतली. देशाच्या अंतर्गत व बहिर्गत राजकारणाची त्यांनी घालून दिलेली पायाभूत तत्त्वे तेव्हा सर्वमान्य झाली होती.

नेहरू २७ मे १९६४ या दिवशी वारले. तोपर्यंत त्यांच्या कर्तृत्वाची झळाळी बऱ्याच प्रमाणात डागळली होती. चिनी आक्रमणामुळे व त्यासमोर आपल्या सैन्याला घ्याव्या लागलेल्या माघारीमुळे अलिप्ततावादाला ग्रहण लागले होते. सैन्यावरील खर्चात झालेल्या वाढीमुळे

अनुक्रमणिका

महागाई वाढली व प्रत्यक्ष करांचे ओझे शिगेला पोचले होते. तिसरी पंचवार्षिक योजना डबघाईला आली होती. काँग्रेसच्या अंतर्गत राजकारणातही नेहरूंवर टीकेचा मारा होत होता व त्यापासून बचाव करण्यासाठीच त्यांना 'कामराज्य योजने'चे कपट करावे लागले, असे बोलले जात होते. देशातील अन्नधान्याचा पुरवठा अगदीच तुटपुंजा होता व अमेरिकेकडून पी. एल्. ४८० कलमाचा आधार घेऊन व रुपयाच्या चलनात किंमत देण्याची सवलत मिळवून धान्य आणावे लागत होते. ही रुपयातली रक्कम अमेरिकेच्या वकिलातीच्या खजिन्यात वाढत चालली होती. पण हे सर्व होत असतानाही आम्हास असे वाटे की, स्थिती गंभीर आहे हे खरे; मोठ्या गफलती सरकारकडून झाल्या आहेत; पण त्याचा दोष नेहरूंकडे नाही. हा मंत्र्यांच्या आणि प्रशासकीय अधिकाऱ्यांच्या हलगर्जीपणाचा परिणाम असला पाहिजे.

नेहरूंच्या कारकिर्दीतील गैरकारभाराचे दुष्परिणाम दिसत असतानाही खुद्द नेहरूंना मात्र त्या चुकांपासून दूर ठेवण्याचे औदार्य त्या काळातील लोकांमध्ये कुठून आले असावे? मला असे वाटते की, आमची व त्यामागची पिढी यांनी ज्या आकांक्षा बाळगल्या होत्या, जो उणापुरा ध्येयवाद जपला होता, भविष्यात अधिक समृद्धी येईल अशी उमेद धरली होती, त्या अस्फुट भावनांना मूर्तरूप देण्याची व त्या स्पष्ट शब्दांत मांडण्याची किमया नेहरूंमध्ये होती. आमची जी प्राप्तव्ये होती ती मिळवून देण्याचे नेकीचे प्रयत्न करणारा हा नेता आहे, अशी आमची खात्री पटली होती. त्यामुळे जेव्हा केव्हा आपण ज्या दिशेने वाटचाल करीत आहोत त्यात अडथळे येत आहेत किंवा आपल्या आशा व उमेदी यांच्याशी प्रशासन प्रतारणा करीत आहे असा अनुभव येई, तेव्हा त्या फसवणुकीत नेहरूंचा हात नाही, अशी समजूत करून घेण्यातही मोठा दिलासा वाटे.

नेहरू वारले त्याला यंदा पन्नास वर्षे झाली व आता १४ नोव्हेंबरला त्यांच्या जन्माला १२५ वर्षे पुरी होत आहेत. सुमारे सतरा वर्षे देशाचा एकहाती कारभार नेहरूंनी केला. त्यांनी त्या वेळी जी धोरणे आखली व ज्या क्षेत्रांकडे दुर्लक्ष केले, त्याचे दीर्घकालीन परिणाम झाले व राष्ट्राच्या घडणीत बुलंदपणा आणि पडझड या दोन्हींचा आढळ झाल्याचे आजही दिसून येत आहे. नेहरूंच्या कार्यकर्तृत्वाची त्या दृष्टिकोणातून तपासणी करणे हेदेखील त्यांना श्रद्धांजली वाहिल्याप्रमाणेच होईल.

(१)

स्वातंत्र्य मिळाले तेव्हा देशात शिक्षणाची जी व्यवस्था होती, तिच्यात चार प्रमुख अंगे आपल्याला दिसतात. येथील वसाहतवादी सरकारने आपल्या गरजांना अनुसरून स्थापन केलेली व वाढवत नेलेली एक शिक्षणव्यवस्था होती. आपल्याला प्रशिक्षित नोकरवर्ग मिळण्यासाठी परकीय सरकारने ही शिक्षणव्यवस्था उभारली, असे त्या व्यवस्थेचे टीकाकार म्हणत असले तरी खुद्द सरकारचे– कदाचित प्रामाणिक– समर्थन असे होते की, हिंदी समाज जगाच्या मुख्य प्रवाहापासून बाजूला राहून एखाद्या डबक्याप्रमाणे नासून गेला होता; त्याला आधुनिक शिक्षण देऊन प्रगतीच्या प्रवाहात आणून ठेवण्याचे इतिहासदत्त कर्तव्य आम्ही पार पाडत आहोत. या शिक्षणाचा एक परिणाम असा झाला की, नोकरशाही आणि रयत यांच्यात दुवा होऊन राहणारा, पण संख्येने अतिशय लहान असणारा एक वर्ग तयार झाला. त्याला मध्यमवर्ग असे नाव मिळाले.

तथापि, एक-दोन पिढ्या उलटताच या सरकारी शिक्षणाचे दोष येथील समाजाच्या लक्षात येऊ लागले. पहिली गोष्ट म्हणजे हे शिक्षण समाजाच्या सर्व थरांपर्यंत पोचवण्याची इच्छा म्हणा किंवा प्रशासनकौशल्य म्हणा, नोकरशाहीच्या ठिकाणी नव्हते. या शिक्षणातून बाहेर पडलेल्या विद्यार्थ्यांना सरकारी नोकऱ्या व सरकारच्या आश्रयाने चालणारे वकिली, वैद्यकी, पत्रकारिता इत्यादी उद्योग एवढीच निर्वाहाची क्षेत्रे उपलब्ध होती. त्यामुळे नवशिक्षितांची संख्या मर्यादित राहावी असाच सरकारचा हेतू असावा. फार लोक पदवीधर होत आहेत, अशी हाकाटी इंग्रज अधिकाऱ्यांच्या लिखाणातून आढळते त्याचे बीज हेच आहे. दुसरे असे की, १९ व्या शतकात शिक्षणाचे माध्यम इंग्रजी होते आणि दिले जाणारे शिक्षण केवळ पुस्तकी होते. शिकवले जाणारे विषय व विद्यार्थ्यांचे दैनंदिन जीवन यांचा फारच थोडा संबंध होता. परिणाम असा होत असे की, शिक्षणातून मिळणारे ज्ञान हा चिंतनाचा विषय न राहता पाठांतराचा भाग होऊन बसे.








तिसरा आणि समाजाच्या दृष्टीने महत्त्वाचा भाग असा होता की, समाजाची परंपरा व येथे निर्माण झालेले आणि पिढ्यान् पिढ्या चालत आलेले ज्ञान यांचा पुसटसा संबंधही नव्या शिक्षणात येत नसे. साहजिकच या नव्या शिक्षणाविषयी समाजात आदर किंवा आपुलकी निर्माण झाली नाही व केवळ नोकरीधंदा मिळविण्याचे साधन म्हणून लोक शिक्षणाकडे पाहू लागले.

तथापि, जसजशा राजकीय सुधारणा मिळत गेल्या व जनतेच्या प्रतिनिधींचा शिरकाव राज्ययंत्रणेत होत गेला, तसतशी या सरकारी शिक्षणातही अनुकूल सुधारणा होत गेली. प्राथमिक शिक्षण सक्तीचे व निःशुल्क असावे अशी मागणी ना. गोखले यांनी मध्यवर्ती विधिमंडळात जोराने मांडली मॉंटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणांनंतर प्रांताच्या स्तरावरील शिक्षणखाते एतद्देशीय मंत्र्यांकडे आल्यावर पंजाबसारख्या प्रांतात, कागदावर का होईना, पण प्राथमिक शिक्षण सक्तीचे झाले. पुरेशा शाळा न उघल्याने त्याचा व्हावा तितका उपयोग झाला नाही. माध्यमिक शिक्षणातील इंग्रजी माध्यम काही विषयांपुरतेच मर्यादित करण्यात आले. शारीरिक शिक्षण देण्यात येऊ लागले. उच्च शिक्षणाविषयी बोलायचे तर नागपूर, लखनौ अशी नवी विद्यापीठे स्थापन झाली.

सरकारच्या आश्रयाखाली पण स्वतंत्र अशा शिक्षण-संस्थाही उदयाला आल्या. बनारस हिंदू विद्यापीठ, शान्तिनिकेतन, गुरुकुल कांगडी, बंगलोरची इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स या संस्थांचा या संदर्भात उल्लेख करायला हवा. कर्वे स्त्री-शिक्षणसंस्था व ना. दा. ठा. महिला विद्यापीठ या संस्थांच्या पदव्यांना सरकारी मान्यता नव्हती व सरकारी अनुदान मिळत नव्हते. पण त्याही संस्था सरकारने चालवून घेतल्या होत्या.

(२)

एकोणीसशे पाच साली बंगालच्या फाळणीच्या निमित्ताने मोठी चळवळ उभी राहिली. तीमधील विचारवंतांनी इंग्रज सरकारच्या सर्वच धोरणांची चिकित्सा आरंभिली. त्यात सरकारी शिक्षणावर कडाडून टीका केली. या मंथनातून 'राष्ट्रीय शिक्षण' ही संकल्पना उदयाला आली. एक 'नॅशनल कौन्सिल ऑफ एज्युकेशन' स्थापन झाले. या संस्थेने राष्ट्रीय शिक्षणाची पाच उद्दिष्टे ठरविली. ती अशी होती :

१. शिक्षण मातृभाषेतून दिले पाहिजे.

२. आपल्या समृद्ध वारशाविषयी अभिमान निर्माण होईल, असे शिक्षण असावे.

३. विज्ञान व तंत्रज्ञान यांच्या प्रगतीमुळे जी नवी मूल्ये उदयाला येत आहेत, त्यांचा स्वीकार करण्याची क्षमता विद्यार्थ्यांत निर्माण झाली पाहिजे.

४. विद्यार्थ्यांच्या शारीरिक व नैतिक सामर्थ्यांची जोपासना शिक्षणातून व्हावयास हवी.

५. औद्योगिक व तांत्रिक प्रशिक्षण विद्यार्थ्यांना दिले गेले पाहिजे.

ही पाचही उद्दिष्टे सर्वमान्य व निरपवाद होती. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीला आपल्या विद्यार्थ्यांना तांत्रिक कौशल्ये शिकता आली पाहिजेत, अशी मागणी सर्वत्र होत होती. मुंबईला लोकांनी पैसे गोळा करून सरकारला दिले व त्यातून 'व्हिक्टोरिया ज्युबिली टेक्निकल इन्स्टिट्यूट' सुरू झाली. नॅशनल कौन्सिल ऑफ एज्युकेशनच्या पुढाकाराने जादवपूर विद्यापीठ हे औद्योगिक व तांत्रिक शिक्षण देणारे नामांकित विद्यापीठ सुरू झाले. स्वातंत्र्य मिळेपर्यंत ते विद्यापीठ सरकारी अनुदान घेत नव्हते.

महाराष्ट्रात अनेक ठिकाणी राष्ट्रीय शाळा सुरू झाल्या. त्यांपैकी तळेगावचे 'समर्थ विद्यालय' ही नमुनेदार शाळा होती. सुमारे दीडशे विद्यार्थी व वीस शिक्षक यांची हे विद्यालय म्हणजे एकत्र वसती (कम्यून) होती. शाळेचे एक शेत होते. विद्यार्थी व शिक्षक शेती करीत व तेथे उपजलेल्या धान्यावर निर्वाह चालवीत. जवळच्या 'पैसाफंड काच कारखान्या'त विद्यार्थी काचकामाचे शिक्षण घेत. यांतल्या काही विद्यार्थ्यांनी (उदा., ओगलेवाडीचे ओगले) स्वतःचे कारखाने काढले किंवा मोठ्या कारखान्यात इंजिनिअर होऊन ते उच्च पदाला गेले. सरकारला या विद्यालयाची इतकी धास्ती वाटत होती की, विशेष हुकूम काढून १९११ साली हे विद्यालय बंद पाडण्यात आले. नंतर इथले काही विद्यार्थी व शिक्षक वाईला प्राज्ञपाठशाळेत दाखल झाले. त्यांनी प्राज्ञपाठशाळेत राष्ट्रीय शिक्षणाचे विद्यालय सुरू केले.

हे सर्व सांगण्याचा उद्देश असा की, इंग्रजी शिक्षण

अनुक्रमणिका

इथे सुरू झाल्यानंतरही सरकारच्या कक्षेच्या बाहेर राहून व समाजाकडून मदत मिळवून, एक निराळी आणि जनतेच्या आशाआकांक्षांशी मिळतीजुळती शिक्षणपद्धती चालविण्याचा प्रयत्न समाजातील काही मंडळींकडून होत होता. त्यात अनेक अडचणी होत्या. समाजाकडून मिळणारा पाठिंबा नेहमीच पुरेसा होता, असे नाही. विद्यार्थ्यांवर व शिक्षकांवर अतिशय कठीण परिस्थिती येत असे. पण तरीही नेटाने राष्ट्रीय शिक्षणाचे काम चालू होते.

असहकार चळवळीपासून 'राष्ट्रीय शिक्षण' या संकल्पनेची प्रौढावस्था सुरू झाली. गांधीजींचा हा आग्रह होता की, प्रत्येक शाळेने व विद्यापीठानेसुद्धा आपल्या खर्चासाठी लागणारे पैसे स्वतःच्या उद्योगातून स्वतःच निर्माण केले पाहिजेत. दुसरे असे की, आपल्या परिसरातील स्वयंसेवी संघटना म्हणून राष्ट्रीय शाळेने काम पाहिले पाहिजे. तिसरा भाग म्हणजे स्वातंत्र्य चळवळीचे तत्त्वज्ञान राष्ट्रीय शाळेच्या कार्यातून आसपासच्या गावा-वस्त्यांतील लोकांच्या अनुभवाला आले पाहिजे. राष्ट्रीय शाळेच्या विद्यार्थ्यांनी सत्याग्रह करून तुरुंगात जावे, अशी अपेक्षा नव्हती; पण सत्याग्रहाची तत्त्वे विद्यार्थ्यांच्या अंगी बाणली पाहिजेत, असा आग्रह होता. अर्थात, एकदा चळवळ सुरू झाली की, सरकारी दडपशाहीचा फेरा या शाळांकडे वळणार, हे साहजिकच होते.

अशा शिक्षणसंस्थांपैकी एक आदर्श आश्रमशाळा म्हणून बार्डोली तालुक्यातील वेडली येथील शाळेचा उल्लेख करावा लागेल. ही शाळा मुळात 'काळी परज' (काळी प्रजा) नावाच्या आदिवासी लोकांना सूत काढणे व मागावर कापड विणणे ही कौशल्ये शिकवण्यासाठी काढण्यात आली. आदिवासी तरुणांसाठी दोन-तीन महिन्यांचे प्रशिक्षण वर्ग चालवले जात. या शाळेत जुगतराम दवे हे गांधीजींचे निष्ठावान शिष्य झाले. त्यांनी दोन वर्षांचा अभ्यासक्रम सुरू केला. प्रत्येक विद्यार्थ्याने रोज सहा तास चरख्यावर व मागावर काम करावे. चरखा व माग यांची दुरुस्ती करण्याचे कौशल्य आत्मसात करावे. नंतर दोन तास त्यांना लिहिणे-वाचणे व हिशेब ठेवणे हे शिकवले जाई. खेरीज शाळेची व गावातल्या रस्त्यांची स्वच्छता, सामाजिक रसोड्यातील स्वयंपाक आणि जेवण वाढणे-आवरणे, वेढछी गावातील घरांत जाऊन लोकांना स्वच्छ राहणी व आरोग्य यांचे शिक्षण देणे अशी कामे करावी लागत. दोन वर्षे शिक्षण घेतलेला विद्यार्थी आपल्या गावी जाई, तेव्हा तो चांगला ग्रामसेवक होऊन राही.

एकोणीसशे सदतीस साली गांधीजींनी 'बुनियादी शिक्षणा'ची संकल्पना मांडली. राष्ट्रप्रेम, स्वार्थत्याग आणि शरीरश्रम हा पायाभूत तत्त्वे मानून त्यांवर आधारलेली ही शिक्षणपद्धती पहिल्या सात इयत्तांसाठी व त्यानंतरच्या चार वर्षांसाठी 'उत्तर बुनियादी शिक्षण' ही व्यवस्था करण्यात आली. तत्कालीन मुंबई प्रांताने ही शिक्षणपद्धती स्वीकारली व वेडछी आश्रमासारख्या ज्या संस्था अशा प्रकारचे शिक्षण आधीपासून देत आल्या होत्या, त्यांना एक-एक सरकारी शाळा चालवायला दिली. खादी, शेती आणि झोपड्या बांधणे हे तीन उद्योग विद्यार्थ्यांकडून करून घ्यायचे. खेरीज गणित, भाषा, विज्ञाने इ. विषय शिकवायचे, असे अभ्यासक्रमाचे स्वरूप होते. शेतीच्या मशागतीच्या व सुगीच्या मोसमात गावातले शेतकरी विद्यार्थ्यांना नांगरणी, पेरणी, कापणी इ. कामे देत व त्याचा मेहताना विद्यार्थ्यांना मिळे. त्या पैशातून विद्यार्थ्यांची पुस्तके व गणवेश यांची तरतूद होत असे. सर्व विद्यार्थी कापूस पिंजणे, सूत-कताई व कापड विणणे ही कामे करत असतच. खेरीज गावावर दुष्काळ, पूर, आजाराची साथ अशी संकटे येत. तेव्हाही विद्यार्थी स्वयंसेवक म्हणून मदत करीत. शिक्षणाचे माध्यम म्हणून मातृभाषा म्हणजे प्रमाण गुजराती नव्हे, तर वेडछीची बोलीभाषा वापरली जाई. गावात जी सार्वजनिक कामे– उदा., रस्ता बांधणे किंवा शौचकूप तयार करणे – उभी राहत, त्यांतही विद्यार्थी भाग घेत. त्यानंतर १९५० पासून पुढे वेडछी आश्रमाने उत्तर-बुनियादी अभ्यासक्रम चालू केला. त्यात उद्योग, समाजसेवा, ग्रामसफाई या विषयांचा अभ्यासक्रम होता. या शाळा कमीत-कमी सरकारी मदत घेऊन चालविल्या जात होत्या.

सरकारी नियंत्रणाच्या व सरकारी मदतीच्या बाहेर राहूनही चांगले व समाजाला उपयोगी वाटेल असे शिक्षण देता येते, हे राष्ट्रीय शिक्षणाच्या विविध प्रयोगांद्वारे





अनुभवाला आले होते. त्याखेरीज रयत शिक्षण संस्थेसारख्या काही संस्था होत्या की, ज्यांनी सरकारी शिक्षणच पण अगदी कमी खर्चात खेडोपाडी पोचवले होते. जे गाव रु. २०००/- उभे करील तिथे माध्यमिक शाळा काढली जाईल, अशी 'रयत शिक्षण संस्थे'ची प्रतिज्ञा होती. त्या शाळेतीलल विद्यार्थ्यांसासाठी लागणाऱ्या सोयी ही संस्था स्वतः पुरवत होती. विद्यार्थ्यांसाठी वसतिगृहे, त्यांच्या जेवण्याची व आरोग्याची देखभाल अशा सुविधा संस्थेकडून मिळत. पुण्यातील 'अनाथ विद्यार्थिगृह' हीदेखील अशीच नामवंत संस्था होती.

(३)

राष्ट्रीय शिक्षण, बुनियादी शिक्षण आणि 'रयत शिक्षण संस्था' व 'अनाथ विद्यार्थिगृह' या संस्थांची कामगिरी इतक्या विस्ताराने वर्णन करण्याचे कारण असे की, स्वतंत्र भारताची घटना अमलात आली त्या सुमारास नवीन सरकारच्या हाताशी खाजगी आणि स्वयंसेवी संस्थांचे, मर्यादित का होईना, असे जाळे होते की, ज्याचा उपयोग करून घेऊन आणि तशा संस्था देशाच्या इतर भागात निर्माण होतील असे वातावरण निर्माण करून अगदी कमी खर्चात प्राथमिक शिक्षणाचा मोठा विस्तार करता आला असता.

आपण स्वतंत्र झालो तेव्हा साक्षरता व प्राथमिक शिक्षण या दोन्हींच्या बाबतीत आपली स्थिती गंभीर होती. विसाव्या शतकाच्या सुरुवातीला देशात साक्षरतेचे प्रमाण फक्त ५ टक्के होते. (स्त्रियांमध्ये तर हे प्रमाण फक्त ०.६ टक्के होते.) त्या वेळी देशाची लोकसंख्या २३ कोटी होती. १९५० साली साक्षरतेचे प्रमाण वाढून २२ टक्क्यांपर्यंत गेले होते व लोकसंख्या ३३ कोटी झाली होती. मागे सांगितल्याप्रमाणे २० व्या शतकाच्या सुरुवातीपासूनच लोकनेत्यांची ही मागणी होती की, प्राथमिक शिक्षण सक्तीचे व मोफत करण्यात यावे. हा इतिहास लक्षात घेऊनच घटनेच्या ४५ व्या कलमात अशी तरतूद करण्यात आली होती की, 'वयाची चौदा वर्षे पुरी होईपर्यंत सर्व मुलांना मोफत व सक्तीचे शिक्षण मिळावे म्हणून ही घटना सुरू असल्यापासून दहा वर्षांच्या आत तशी व्यवस्था सरकार करील.' हे कलम घटनेच्या 'राज्याच्या धोरणासंबंधी मार्गदर्शक तत्त्वे' या चौथ्या भागात घातले होते; याचा अर्थ असा की, हा जनतेचा हक्क नव्हता; पण सरकारवर ही जबाबदारी टाकली होती. विशेष म्हणजे या तत्त्वाखेरीज दुसऱ्या कोणत्याच मार्गदर्शक तत्त्वाच्या अंमलबजावणीसाठी अशी कालमर्यादा घातलेली नव्हती.

साहजिकच अपेक्षा अशी होती की, पंतप्रधान नेहरू व शिक्षणमंत्री अबुल कलम आझाद (आणि त्यांच्या मृत्यूनंतर हुमायून कबीर) हे प्राथमिक शिक्षणाला अग्रक्रम देतील आणि हाती असलेली सर्व साधने साक्षरता व सक्तीचे प्राथमिक शिक्षण सार्वत्रिक करण्याच्या कामाला लावतील. पण सरकारचा अग्रक्रम विपरीत राहिला. कसे ते पाहा. इंग्रज सरकारने १९४४ साली सार्जंट समिती नेमली होती. त्या समितीने शिक्षणाची सद्यःस्थिती व भविष्यकालीन विकासाची योजना यासंबंधीचा अहवाल तयार केला होता. त्या अहवालात प्राथमिक, माध्यमिक व उच्चस्तरीय शिक्षणाचा विचार केला होता. स्वातंत्र्यानंतर आलेल्या सरकारने सार्जंट समितीचा अहवाल विचारातही घेतला नाही. उलट, १९४८ साली, म्हणजे घटना तयारही झाली नव्हती अशा काळात, डॉ. राधाकृष्णन यांच्या अध्यक्षतेखाली, उच्च शिक्षणाचा विचार करण्यासाठी एक आयोग नेमला. हा आयोग नेमल्याने शिक्षणाशी संबंधित अशा लोकांना सूचना गेली की, स्वतंत्र भारताच्या सरकारला प्राथमिक शिक्षणात रस नाही. त्यानंतर १९५२ साली सरकारने माध्यमिक शिक्षणाचा विचार करण्यासाठी मुदलियार आयोग नेमला. पण प्राथमिक शिक्षणाचा तज्ज्ञ पातळीवरून सर्वांगीण विचार कोठारी आयोगाकडूनच (१९६४-६६) झाला.

आपण पाहिले की, नव्या प्रांतिक सरकारांनी स्वातंत्र्यानंतर 'बुनियादी शिक्षणा'चा स्वीकार स्वेच्छा-तत्त्वावर केला होता व गांधीवादी स्वयंसेवकांनी अशा शाळा चालवल्या होत्या. पण १९५२-५३ सालापासून सरकारी अधिकाऱ्यांचा बुनियादी शिक्षणाविषयीचा उत्साह उतरणीला लागला. बुनियादी शिक्षणाच्या प्रसाराला मोठा अडथळा इंग्रजी भाषा शिकण्याचा होता. बुनियादी शिक्षणात इंग्रजी भाषेच्या शिक्षणाला गौण स्थान होते. हे शिक्षण सुरू करताना अटकळ अशी होती की, सरकारी व्यवहारातून इंग्रजीचा वापर कमी होत जाणार आहे;

आणि इंग्रजी ही केवळ ग्रंथ-भाषा (लायब्रेरी लँग्वेज) म्हणून राहील. (याच अपेक्षेने त्या वेळच्या मुंबई राज्यात इंग्रजीचे शिक्षण ८वी पासून सुरू करण्याचा निर्णय झाला व तेव्हापासून त्या वेळचे शिक्षणमंत्री व मुख्यमंत्री बाळासाहेब खेर लोकांच्या शिव्याशापांचे धनी झाले.) तथापि, प्रत्यक्षात केंद्र सरकारच्या अधिकाऱ्यांचा असा आग्रह होता की, सरकारी कामकाजाची भाषा इंग्रजीच राहिली पाहिजे. विद्यापीठातील शिक्षणही मातृभाषेतून होण्याची शक्यता दिसत नव्हती. परिणामी बुनियादी शिक्षण बाजूलाच पडले. एक फार महत्त्वाचा प्रयोग डावलला गेला.

शिक्षणाच्या तीन टप्प्यांपैकी प्राथमिक शिक्षणाच्या विकासाला प्राधान्य दिले पाहिजे हे घटनेतील तरतुदीवरून स्पष्ट होते. पण सरकारचे धोरण या बाबतीत कायमच संदिग्ध राहिले. पहिल्या पंचवार्षिक योजनेत शिक्षणावर जो एकूण खर्च योजिला होता, त्यापैकी ५६ टक्के रक्कम प्राथमिक शिक्षणासाठी ठेवली होती. ती कमी होता होता चौथ्या योजनेत ३० टक्क्यांवर येऊन ठेपली. (ही योजना नेहरूंच्या मृत्यूनंतर तयार करण्यात आली.) हा झाला खर्चाचा भाग. खेरीज प्राथमिक शिक्षणाचे संघटन आणि व्यवस्थापन, अभ्यासक्रमाची आंखणी व क्रमिक पुस्तकांची निर्मिती या महत्त्वाच्या बाबी पूर्णपणे नोकरशाहीच्या ताब्यात गेल्या. प्राथमिक शिक्षणाविषयी होत असलेले संशोधन शाळांपर्यंत व अध्यापनापर्यंत पोचेनासे झाले. त्यामुळे शिक्षणाची गुणवत्ता वाढली नाही. दुसऱ्या बाजूने शिक्षणाचा विस्तारही पाहिजे त्या गतीने झाला नाही. प्राथमिक शिक्षण सक्तीचे व निःशुल्क करण्याची घटनेतील तरतूद १९६० सालापर्यंत प्रत्यक्षात आली असती, तर आज निरक्षरतेचे निर्मूलन झाल्याचे दिसले असते.

यावर असा आक्षेप घेतला जाईल की, प्राथमिक शिक्षणाची जी हेळसांड झाली तिच्याशी नेहरूंचा साक्षात संबंध नाही. प्राथमिक शिक्षण हा राज्यांच्या अधिकारातील विषय होता व त्यासंबंधीचे निर्णय राज्य-सरकारांनी घ्यायचे होते. केंद्रीय प्रशासनाची भाषा इंग्रजी ठेवण्याच्या हट्टामुळे 'बुनियादी शिक्षणा'चा प्रयोग फसला, हे म्हणणे अप्रस्तुत आहे; कारण कारभाराची भाषा म्हणून इंग्रजीचा वापर करणे अपरिहार्य झाले होते वगैरे. तथापि, हे ध्यानात घेणे जरूरीचे आहे की, सर्व राज्यांत काँग्रेस पक्षाचीच मंत्रिमंडळे होती. (केरळात ५७ साली काही महिने कम्युनिस्ट पक्षाचे मंत्रिमंडळ होते.) नेहरू काँग्रेस पक्षाचे अनेक वर्षे अध्यक्ष होतेच; पण त्यांनी अध्यक्षपद सोडल्यावरही काँग्रेस पक्षात त्यांचाच विचार निरपवादपणे मान्य होत असे. तेव्हा पक्षपातळीवर प्राथमिक शिक्षणाविषयी महत्त्वाचे निर्णय घेऊन त्यांची देशभर अंमलबजावणी करणे नेहरूंना अशक्य नव्हते. तीच गोष्ट इंग्रजीच्या शिक्षणाची. बुनियादी शिक्षणाच्या संकल्पनेतही इंग्रजीच्या अभ्यासावर अधिक भर देण्यात यावा, असा बदल करून घेता आला असता. खरी गोष्ट अशी दिसते की, नेहरूंना प्राथमिक शिक्षण या विषयात स्वारस्यच वाटत नव्हते.

(४)

स्वातंत्र्य मिळाल्यानंतर ज्यांच्या नेतृत्वाखाली स्वातंत्र्याची चळवळ चालत राहिली तेच पुढारी राज्यावर येणार, हे स्पष्टच होते व तसे झालेही. चळवळीच्या शिखरस्थानी इंग्रजी शिक्षणव्यवस्थेतून बाहेर पडलेल्या व आपापल्या प्रदेशात 'अभिजन' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या व्यक्ती होत्या, हेही उघडच आहे. पण हे प्रादेशिक 'अभिजन' जिच्याखाली झाकले जातील असा सायीसारखा व अखिल भारतीय विस्तार असणारा 'उच्च अभिजनवर्ग' स्वातंत्र्यानंतर पुढे आला. हा वर्ग स्वातंत्र्या-पूर्वीही उपस्थित होता, पण तो स्वातंत्र्य-चळवळीत मात्र सामील नव्हता. श्रीमंत उद्योगपती, परदेशी शिकून आलेले व इंग्रजी भाषेवर प्रभुत्व असणारे शास्त्रज्ञ, उच्चपदस्थ सनदी अधिकारी, बिगर-सरकारी स्वयंसेवी संघटनांतून काम करणारे चुणचुणीत व उच्चशिक्षित स्त्री-पुरुष अशांचा यात समावेश होता. होमी भाभा, विक्रम साराभाई, गगनविहारीलाल मेहता, तारा अली बेग, गिरिजा शंकर बाजपेयी, प्रशान्त चंद्र महालनोबीस ही काही ठळक नावे. खुद्द नेहरू हे तर अशा वर्गाचे मुकुटमणी म्हणून शोभतील अशी व्यक्ती होते. (मात्र ते स्वातंत्र्य-चळवळीचेही श्रेष्ठ नेते होते.) साहजिकच प्रादेशिक अभिजनातून आलेल्या आपल्या सहकाऱ्यांपेक्षा या उच्च-अभिजनवर्गातील मंडळींशी त्यांचे जास्त दळणवळण

अनुक्रमणिका

असे. त्यामुळेच सरकारी धोरणांवर या उच्च-अभिजनवर्गाच्या विचारसरणीचा प्रभाव राही.

कोणत्याही समाजातील अभिजनवर्ग–इथून पुढे मी या उच्च-अभिजनवर्गालाच अभिजनवर्ग हे सुटसुटीत नाव वापरणार आहे – कितीही उदार विचारसरणीचा असला, तरी त्याचा एक आग्रह हमखास असतो की, स्वत:साठी इतरेजन-वर्ज्य (एक्स्क्लूझिव्ह) असे स्थान राखून ठेवायचे. याचे त्या काळातील ठळक उदाहरण म्हणजे मुंबई-पुणे धावणारी डेक्कन-क्वीन ही गाडी. तिला फक्त पहिल्या व दुसऱ्या वर्गाचे (त्या वेळी 'तिसरा वर्ग' म्हणूनही एक वर्ग होता) आणि महाग तिकिटाचे डबे असत. साहजिकच ही इतरेजन-वर्ज्य अशी गाडी होती. पण एकदा लोकशाही तत्त्वावरील राज्यव्यवस्था स्वीकारल्यावर अशी इतरेजन-वर्ज्य हिरवी बेटे राखून ठेवण्याचा आग्रह धरून चालत नाही. आपल्या राखीव स्थानाला घातलेल्या तटबंदीची दारे आधी किलकिली करून नंतर सताड उघडी टाकावी लागतात व अभिजनवर्ग ते ठिकाण सोडून अधिक उंचीवरच्या जागी जाऊन राहतो. एखादे स्थान इतरेजन-वर्ज्य ठेवण्याचा लोकशाहीच्या चौकटीतील विधिमान्य उपाय म्हणजे त्या ठिकाणी पोचण्यासाठी सकृद्दर्शनी नि:पक्षपाती वाटणाऱ्या पण अंतत: अभिजनवर्गाला सोयीच्या असणाऱ्या कसोट्या ठेवायच्या. इंग्रज सरकारने योजलेली आय्. सी. एस्. परीक्षा ही याच धर्तीची कसोटी होती. नेहरूंच्या काळातील आय्. ए. एस्. परीक्षादेखील आय्. सी. एस्. चा आदर्श ठेवूनच तयार केली होती.

आय्. ए. एस्. ची परीक्षा हा अभिजनवर्गात प्रवेश करण्याचा राजमार्ग असल्याने त्या परीक्षेसाठी जो अभ्यासक्रम ठरविला होता, त्याचे प्रारूप लक्षात घेऊनच विद्यापीठाच्या पदवीपरीक्षांचे अभ्यासक्रम आखले होते. आय्. ए. एस्. परीक्षेमध्ये स्वेच्छेने निवडलेल्या तीन विषयांत परीक्षा द्यावी लागे व या तीनपैकी (स्वेच्छेने निवडलेल्या) एका विषयात वरच्या दर्जाच्या प्रश्नपत्रिकांना तोंड द्यावे लागे. स्वातंत्र्यापूर्वी व नंतरही सुमारे १० वर्षे विद्यापीठाच्या पदवीपरीक्षेसाठी एक गौण व एक प्रधान विषय निवडावयाचे असत. पण आता विद्यापीठांनी नवीन आकृतिबंध तयार केला. विद्यार्थ्याने दोन विषय गौण पातळीवर व एक प्रधान पातळीवर निवडावा. याच सुमारास विद्यापीठांनी असेही ठरविले की, चार वर्षांपैकी पहिले वर्ष पदवीपूर्व (प्री डिग्री) अभ्यासाचे असावे व पुढच्या तीन वर्षांत एकात्मिक (इंटिग्रेटेड) अभ्यासक्रम ठेवावा.

हे सर्व करताना हाही उद्देश होता की, पदवी अभ्यासक्रमासाठी जाणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या कमी करता यावी. त्या वेळेस अभिजनवर्गाने व त्याच्या अखत्यारीतील प्रसिद्ध साधनांनी असा समज पसरविला होता की, शालान्त परीक्षा उत्तीर्ण करणाऱ्या विद्यार्थ्यांपैकी फार मोठ्या संख्येने विद्यार्थी महाविद्यालयात प्रवेश घेतात. खरे पाहता १९८६ साली, 'नवे शैक्षणिक धोरण' सरकारने तयार केले तेव्हाही, संबंधित वयोगटातील १०० पैकी फक्त ४ विद्यार्थी पदवीधर होत होते. त्यावरून असा अंदाज बांधता येतो की, १९६० सालच्या सुमारास, संबंधित वयोगटातील १०० पैकी फारतर ३ विद्यार्थी पदवी अभ्यासक्रमाकडे जात असावेत. त्या काळी शालान्त परीक्षा किंवा पदवीपूर्व परीक्षा यांतील उत्तीर्णांची टक्केवारी क्वचितच ५० च्या वर जाई. (आता शालान्त व उच्च शालान्त परीक्षांतील उत्तीर्णांची टक्केवारी ९० पेक्षा कमी क्वचितच असते.)

हे खरेच आहे की, पदवीधर होणे याला समाजात मोठी प्रतिष्ठा होती. पण पदवी मिळाली म्हणून नोकरी मिळेलच याची खात्री नसे. बहुतेक पदवीधर हे कला व वाणिज्य शाखांतून पदवी मिळविलेले असत. अनेक महाविद्यालयांतून विज्ञान-विभागच नसे. त्यासाठी लागणारा खर्च महाविद्यालय चालविणाऱ्या संस्थेला परवडणारा नसे. विद्यापीठांनी जर अनेक प्रकारचे व्यावसायिक अभ्यासक्रम सुरू केले असते, तर अनेक तरुण त्यांकडे वळले असते व थोड्याच काळात पोटापाण्याचा व्यवसाय करू लागले असते. पण त्या काळात जेवढी विद्यापीठे होती व त्यात सर्व मिळून जितके विद्यार्थी होते, त्यांपैकी फक्त १०-१५ टक्के विद्यार्थ्यांना व्यावसायिक अभ्यासक्रमांसाठी प्रवेश मिळत होता. [१] [इथे व्यावसायिक अभ्यासक्रमात वैद्यक, अभियांत्रिकी, शेती, शिक्षण व परिचर्या (नर्सिंग) यांचा समावेश केला असून विधी व वाणिज्य या शाखांचा समावेश केलेला नाही.]

अभिजनवर्गाने पदवीपर्यंतच्या शिक्षणाची दारे थोडी तरी किलकिली केली होती; पण पदव्युत्तर शिक्षणाच्या सोयी आणखीच तुटपुंज्या होत्या. पदवीपर्यंतचे शिक्षण महाविद्यालयात मिळत होते व बहुतेक जिल्ह्यांच्या मुख्य ठिकाणी महाविद्यालये स्थापन झाली होती. या महाविद्यलयातील शिक्षण मामुली गुणवत्तेचे आहे, अशी हाकाटी होतीच. शिवाय जिल्ह्याच्या ठिकाणच्या महाविद्यालयातील विद्यार्थी इंग्रजी विषयात कच्चे असल्याने कला व वाणिज्य महाविद्यालयांत स्थानिक भाषेचा वापर करून शिकवले जाई, हीदेखील अभिजनवर्गाच्या दृष्टीने उपहासाची गोष्ट होती. पदव्युत्तर शिक्षण मात्र विद्यापीठातील विभागातूनच दिले जाई. साहजिकच जिल्ह्याच्या ठिकाणांहून पदवी मिळविलेले फारच थोडे विद्यार्थी पदव्युत्तर शिक्षणासाठी दूरच्या जागी जाऊ शकत. खरेतर महाविद्यालयातून पदव्युत्तर शिक्षण मिळण्याची सोय करायला काहीच हरकत नव्हती. पण १९७० पर्यंत तरी महाविद्यालयांना पदव्युत्तर केंद्रे मिळत नव्हती.

घटनेने विद्यापीठांची स्थापना, नियमन व विसर्जन या बाबतींतील अधिकार राज्याला बहाल केले होते. (राज्यांची विषयसूची क्र. ३२.) संघराज्याचे या विषयातले अधिकार फक्त बनारस हिंदू युनिव्हर्सिटी, अलिगड मुस्लिम युनिव्हर्सिटी व कायदेमंडळाने कायदा करून ज्यांना 'राष्ट्रीय महत्त्वाच्या संस्था' हा दर्जा दिला होता अशा संस्था यांच्यापुरते मर्यादित होते. (संघराज्याची विषयसूची क्र. ६४.) साहजिकच विद्यापीठातील विषय-विभागांची स्थापना व संवर्धन यांसाठी लागणारे पैसे देण्याची जबाबदारी राज्यसरकारांवर होती; आणि हा खर्च करण्याची इच्छा व सामर्थ्य राज्य सरकारांपाशी नव्हते. उत्तर प्रदेश, बिहार, बंगाल, पंजाब इ. राज्यांतील विद्यापीठांत (उदा., लखनौ, अलाहाबाद, पटना, कलकत्ता, दिल्ली इ. विद्यापीठे) पदव्युत्तर विभाग पूर्वीपासूनच होते. महाराष्ट्र, गुजरात, मध्यप्रदेश इ. राज्यांतील विद्यापीठे ही केवळ परीक्षा घेणाऱ्या यंत्रणा होत्या. आपण ज्या अभिजनवर्गाचा विचार करीत आहोत तो, मोठ्या प्रमाणात, या उत्तरेकडील विद्यापीठांतून शिक्षण घेतलेल्या (व पुढे परदेशांतून पावन होऊन आलेल्या) व्यक्तींचा बनलेला होता. परिणाम असा झाला होता की, दक्षिणेकडील विद्यापीठांतील पदव्युत्तर शिक्षण मुळातच मागास राहिलेले होते. त्यानंतर संघ सरकारने विषयसूची क्र. ६६ चा उपयोग करून विद्यापीठ अनुदान मंडळ (वि. अ. मं. ची) स्थापना केली व उच्च शिक्षणाचा दर्जा वाढविण्यासाठी विद्यापीठांना आर्थिक मदत मिळणे सुरू झाले. पदव्युत्तर विभागातील स्थाने वि. अ. मं. ने मंजूर केली, तरी ५ वर्षांनंतर त्या स्थानांचा भार राज्यसरकारालाच उचलावा लागे. म्हणून वि. अ. मं. ने मंजूर केलेल्या स्थानाला (पोस्ट) राज्य सरकारचीही मान्यता असावी लागे. साहजिकच अनेक पदव्युत्तर विभाग पुरेशा शिक्षकांच्या अभावी अक्षम राहत व महाविद्यालयीन शिक्षकांच्या मदतीनेच तेथील अध्यापनकार्य पार पडे. नेहरूंना उच्च शिक्षणात खूप रस होता. त्यांनी राधाकृष्णन समिती नेमली त्यावरून ते स्पष्ट झाले होते. घटनेत दुरुस्ती करून उच्चशिक्षण हा विषय समवर्ती सूचीत त्यांना घेता आला असता. (पुढे इंदिरा गांधींच्या काळात तसे झालेही.) पण नेहरूंनी या बाबतीत पुढाकार घेतला नाही. ते कसे झाले ते आता पाहू.

घटनेतील संघसूचीच्या कलम ६५ मध्ये अशी तरतूद आहे की, धंदेशिक्षणविषयक व विशिष्ट तंत्रज्ञान देणाऱ्या संस्था आणि विशिष्ट अभ्यासाचा व संशोधनाचा पुरस्कार करणाऱ्या संस्था ह्या संघराज्याच्या अधिकारात येतात. त्याचप्रमाणे याच सूचीतील कलम ६८ मध्ये असे म्हटले आहे की, सर्व्हे ऑफ इंडिया आणि भूगर्भशास्त्र, वनस्पतिशास्त्र, प्राणिशास्त्र, मानववंशशास्त्र, हवामानशास्त्र यांच्या क्षेत्रात काम करणारी संस्थादेखील संघराज्य स्थापन करू शकते व त्यांचे संवर्धन करू शकते. अभिजनवर्गाने विद्यापीठांच्या अखत्यारीपासून दूर केंद्र सरकारच्या आर्थिक मदतीवर भरभराटीला येऊ शकतील अशा अनेक संस्था स्थापन केल्या. भारतीय प्रौद्योगिकी संस्था (आ. आय. टी.), भारतीय सांख्यिकी संस्था, निरनिराळ्या विषयांतील राष्ट्रीय प्रयोगशाळा ही व अशांसारखी 'गुणवत्तेची बेटे' तयार झाली. या संस्थांनी काही उपयोगी काम केले, हे खरेच आहे; पण त्यांच्यावर जो खर्च झाला त्याच्याशी तुलना करता देशाला फायदा होईल असे फारच थोडे काम झाले, असा सार्वत्रिक

समज आहे. याचे कारण हेच की, इतरेजन-वर्ज्य अशा संस्था म्हणून त्यांची जोपासना करण्यात आली.

याउलट, हेच पैसे विद्यापीठांतील पदव्युत्तर विभाग विकसित करण्यासाठी वापरले असते, तर त्यापासून अनेक फायदे झाले असते. एक म्हणजे, विद्यापीठांतील अध्ययन-अध्यापन परीक्षाकेंद्री न राहता ते संशोधनपर झाले असते. त्यासाठी विद्यापीठांच्या परिपाठात मोठ्या प्रमाणावर लवचीकता आणायला लागली असती व तेही विद्यापीठांच्या फायद्याचे ठरले असते. दुसरे असे की, या प्रयोगशाळांतील संशोधन हे मोठ्या प्रमाणावर पाश्चात्त्य संशोधनपर नियतकालिकांतून चर्चिल्या जाणाऱ्या विषयांशी संबंधित असे. हे खरेच आहे की, बहुतेक विज्ञानशाखांचा विकास हा पाश्चात्त्य परंपरेत झालेला असल्याने त्यांना पडलेले प्रश्नच त्या त्या विज्ञानाच्या जिज्ञासेचा विषय होणार. पण या प्रयोगशाळा मुळातच गलिव्हरच्या कल्पनाकथेतील उडत्या बेटावर वसल्या असल्याकारणाने त्यांचे संशोधन भारतीय पर्यावरणातील प्रश्नांशी पूर्ण फारकत घेऊनच चाललेले होते. विद्यापीठांकडे संशोधनाची कामगिरी झाली असती, तर संशोधन भारतीय वास्तवाच्या जवळ आले असते. तिसरा विचार हा की, विद्यापीठीय विद्यार्थ्यांना संशोधनपर चर्चा, वादविवाद, निबंधलेखन, नवीन प्रयोगांची मांडणी यांचे शिक्षण योग्य वयात मिळून एकूण देशातील विचार-स्तर उंचावला असता. दुर्दैवाने परदेशी संशोधन, परकी भाषा, परकीय प्रश्न यांच्या आकर्षणामुळेच, ज्याला अभिजनत्व आले होते अशा वर्गाचा दबदबा सरकारी धोरण ठरविणाऱ्यांमध्ये असल्याने उच्च शिक्षणाला स्वदेशी घडण मिळूच शकली नाही.

सारांश, नेहरूंच्या राजवटीत शिक्षण या अतिशय महत्त्वाच्या विषयाची मोठ्या प्रमाणात हेळसांड झाली. गांधीजींसारख्या द्रष्ट्या मनुष्याच्या सल्ल्यानुसार तयार झालेली 'बुनियादी शिक्षणा'ची योजना बासनात बांधली गेली आणि प्राथमिक शिक्षण नोकरशाहीच्या हातात गेले. त्याचा ना विस्तार झाला ना गुणवत्ता वाढली. उच्च शिक्षणाकडे अभिजनवर्गात प्रवेश करण्याचा जिना म्हणून पाहिले गेले. त्या काळी सरकारी धोरणांवर ज्याची पकड होती, त्या अभिजनवर्गाला उच्च शिक्षण सामान्य स्तरापर्यंत पोचेल व आपले इतरेजन-वर्ज्य स्थान झुंडशाहीच्या हाती जाईल, अशी धास्ती वाटली. त्यांनी विद्यापीठांची उपेक्षा केली आणि आपल्या वर्गस्वार्थाच्या रक्षणासाठी केंद्रसरकारच्या अखत्यारीतील इतरेजन-वर्ज्य असा संशोधन संस्था निर्माण केल्या. येथील संशोधन व विद्यार्थी, निदान नेहरूंच्या काळात तरी, परदेशांकडेच डोळे लावून चालले होत. या सर्व नासाडीला नेहरू व्यक्तिशः जबाबदार होते असे म्हणता यायचे नाही; पण त्यांनी शिक्षणाकडे पुरेशा सावधपणे पाहिले नाही, असे म्हणावे लागते.

**आधार ग्रंथ :**

१. जीर्णोद्धार, श्री. मा. भावे, लोकवाङ्मयगृह प्रकाशन, मुंबई, २०११, दुसरी आवृत्ती.

२. मारी जीवनकथा, जुगतराम दवे, नवजीवन प्रकाशन मंदिर, अहमदाबाद, १९७५.

3. Indian Education Developments since Independence. Editors : Marmar Mukhopadhyay and Madhu Parkar., Vikas Publishing House Pvt. Ltd., New Delhi, 1999.

4. India Studies In Social and Political Development (1947-67), Editor : A. Appadorai, Asia Publishing House, Bombay, 1968.

**टीपा :**

१. पुस्तक (४) पान ८०.



# जवाहरलाल नेहरू : नियोजनबद्ध विकास आणि राष्ट्रीय पुनरुत्थान

तारलोक सिंघ
अनुवादक : श्री. मा. भावे

राष्ट्रीय चळवळीच्या काळात स्वातंत्र्याचा सामाजिक व आर्थिक आशय उलगडून सांगण्याची उत्कट इच्छा, गांधींच्या खालोखाल, नेहरूंच्या मनात वसत होती. राष्ट्रीय चळवळीतून अनेक थोर नेते राष्ट्रापुढे आले. पण नेहरूंचा विशेष हा होता की, त्यांनी गरिबी व नियोजनबद्ध विकास या प्रश्नांचा व्यापक राजकीय व आर्थिक संदर्भात विचार केला होता; इतकेच नव्हे, तर या प्रश्नांच्या सोडवणुकीसाठी लागणारे सामाजिक तत्त्वज्ञान आणि मूल्ये यांचीही मांडणी केली होती. आता मागे वळून पाहता असे वाटते की, स्वातंत्र्यानंतर गरिबी नाहीशी करणे व नियोजनबद्ध विकास साधणे यासाठी जी व्यावहारिक पावले उचलावी लागणार होती, त्यांची तयारी नेहरूंनी स्वातंत्र्यपूर्व काळातच केली होती. त्यामुळे आधीची स्वातंत्र्यसेनानीची भूमिका सोडून राज्यधुरंधराची (स्टेट्समन) भूमिका स्वीकारणे नेहरूंना अडचणीचे गेले नाही.

(१)

जवाहरलाल नेहरूंनी ज्या मोठ्या कल्पना मनाशी बाळगल्या होत्या व जो सामाजिक आणि आर्थिक दृष्टिकोण स्वीकारला होता, त्यांची अंमलबजावणी त्यांनी ज्या राष्ट्रीय योजना एकामागून एक राबवल्या, त्यांतून केली. देशभर व निरनिराळ्या क्षेत्रांत लक्षावधी लोक विकासाच्या कामात पूर्वीपासून गुंतलेले होते. या योजनांमुळे अशा माणसांना आपल्या विचारांसाठी व कृतींसाठी आधार मिळाला. एका अद्वितीय नेत्याने निर्माण केलेले तत्त्वज्ञान आणि राष्ट्रीय योजनांतून त्या तत्त्वज्ञानाला मिळालेले प्रकट स्वरूप याचा राष्ट्रीय जीवनावर अतिशय प्रभाव पडला. नेहरूंच्या तत्त्वज्ञानाला त्यामुळे राष्ट्रीय पुनरुत्थानाचे स्वरूप आले. इतर सामाजिक व राजकीय विचारवंत आणि नेहरू यांच्यांत हा फरक आहे. त्यामुळे एरवीच्या विचारवंतांच्या तत्त्वज्ञानाला आपण ज्या बौद्धिक कसोट्या लावतो, त्यांपेक्षा निराळ्या कसोट्या आपल्याला नेहरूंच्या विचारसृष्टीला लावाव्या लागतात. भविष्यातील राष्ट्रीय नियोजन व त्याची अंमलबजावणी यात नेहरूंच्या विचारांना जे स्थान लाभेल, त्यावर नेहरूंच्या विचारांचे सामर्थ्य व त्या विचारांविषयी तरुण पिढीला वाटणारे कुतूहल या गोष्टी अवलंबून राहतील. नेत्याची विचारप्रणाली काही असो; ज्या माध्यमातून ते विचार व्यक्त होतात व ते विचार कोणत्या मूलभूत समस्या सोडवितात, यावरून त्या विचारप्रणालीचे परिणाम लोकांच्या प्रत्ययाला येतात. ज्या वास्तवाशी आणि अंमलबजावणीच्या साधनांशी त्या विचारप्रणालीची सांगड घातली गेली होती, त्या वास्तवापासून आणि अंमलबजावणीपासून ती प्रणाली निराळी केली, तर ती प्रणाली समाजाला मार्गदर्शक म्हणून उपयोगी पडेलही; पण समाजाच्या धारणेवर व प्रगतीवर त्या प्रणालीची जी मुद्रा उमटली, तिचे ज्ञान होणार नाही.

भारताच्या आर्थिक व सामाजिक प्रश्नांचा विचार करणारे नेहरूंचे समकालीन व नेहरू यांच्यात दोन प्रकारचा फरक होता. एक, या विचारवंतांचा अभ्यास दांडगा होता, त्यांना तपशिलांची चोख माहिती होती व त्यांचे ज्ञानही विशाल होते; परंतु यांतील एकापाशीही नेहरूंचा विस्तृत आवाका, प्रश्नांचे प्रत्यक्ष ज्ञान आणि एक समावेशक दृष्टिकोण नव्हता. दुसरे असे की, नेहरूंचा

---

* हा लेख 'स्टडीज इन मॉडर्न इंडियन हिस्टरी, नंबर वन' या बी. आर. नंदा व व्ही. सी. जोशी यांनी संपादिलेल्या व ओरिएन्ट लाँगमन (दिल्ली) यांनी १९७२ साली प्रसिद्ध केलेल्या पुस्तकातून घेतला आहे. श्री. तारलोक सिंग हे भारतीय प्रशासन सेवेत उच्च दर्जाचे अधिकारी होते व नंतर नियोजन मंडळाचे सदस्यही होते. त्यांनी हा लेख १९६७ साली लिहिलेला होता.

अनुक्रमणिका

या प्रश्नांबाबतचा दृष्टिकोण व त्यांनी अंगी बाणवलेली व्यक्तिविषयक व समाजविषयक मूल्ये ही एकजीव झालेली होती. इतरांची अशी गोष्ट नव्हती. नेहरू जे काही बोलत व करत, त्यात त्यांनी आपला जीव ओतलेला असे. ते या विषयांबाबत बोलत ते अगदी प्रामाणिकपणे आणि अकृत्रिमपणे. काही प्रश्न एखाद्या व्यक्तीला इतके महत्त्वाचे वाटतात की, त्यांच्याविषयी बोलताना किंवा त्यांच्या संबंधात कृती करताना माणसाचे अंतःकरण त्यात्त गुंतलेले कळते. नियोजन व विकास हे विषय नेहरूंच्या जिव्हाळ्याचे असल्याने त्यांच्यावर बोलताना नेहरू महत्त्वाच्या आणि दीर्घपरिणामी मुद्द्यांना चटकन हात घालीत, वर्तमानकालीन गुंत्यांच्या ते पलीकडे जात. त्यांचे विचार हमखास सुयोग्य आणि त्यांनी ठरविलेल्या मूलभूत विचारांच्या चौकटीशी सुसंगत असे असत.

भारतीय जीवनपद्धतीची आर्थिक व सामाजिक अंगे आणि लोकशाहीला अभिप्रेत असणारी जीवनपद्धती यांच्या संबंधांत नेहरूंनी व्यक्त केलेले विचार त्यांच्या प्रांजळ व्यक्तिमत्त्वाचे प्रामाणिक दर्शन घडवणारे होतेच; पण भारतीय वास्तव, त्या वास्तवामुळे (नियोजन व विकासावर) पडणाऱ्या मर्यादा आणि (दुसऱ्या बाजूला) या वास्तवामुळेच निर्माण झालेल्या (नियोजन व विकास यांच्या बाबतीतील) शक्यता यांना नेहरूंनी दिलेला प्रतिसाद, असेही त्या विचारांचे रूप असे. ज्या काळात नेहरू वावरले व भारताने स्वातंत्र्य मिळविले, त्या काळाच्या काही गरजा होत्या. नेहरूंचे नियोजनाविषयीचे चिंतन हे त्या गरजांना दिलेले समर्पक उत्तर असे. विसाव्या शतकाच्या तिसऱ्या व चौथ्या दशकांत भारतात जी परिस्थिती होती व जे विचार लोकांच्या मनात घुसमटत होते, त्यांचे प्रतिबिंब नेहरूंच्या चिंतनात पडलेले होतेच; पण भविष्यात जो विकास साधायचा, त्याची बीजेही या (स्वातंत्र्यपूर्व काळात व्यक्तविलेल्या) चिंतनातून दिसून येतात.

नेहरूंच्या हयातीतच त्यांच्या नियोजनाविषयी ज्या कल्पना होत्या, त्यांचे गंभीर परीक्षण खुद्द नेहरूंनी व देशाने करायला हवे होते. तसे झाले असते, तर ते दोघांच्याही हिताचे झाले असते. या कल्पनांतील व्यावहारिक अडचणी ध्यानात येऊन त्यांच्यावर तोडगे काढता आले असते. पण झाले असे की, नेहरूंच्या कल्पनांना (विशेष चर्चा न होताच) मान्यता मिळत गेली व आता (१९७२* साली), नेहरू वारल्यानंतर, त्या कल्पनांविषयी हरकती घेण्यात येत आहेत. पूर्वी ज्या उतावळेपणाने नियोजनाच्या संकल्पनेला मान्यता देण्यात आली, त्याच उतावळेपणाने आता टीका करण्यात येत आहे. शिवाय या टीकेसाठी वापरलेले युक्तिवाद पुष्कळदा फसवे असतात. हे खरेच आहे की, कोणाचेही विचार त्रिकालाबाधित नसतात. एकूण विचारांपैकी काही विचार भविष्यातही मार्गदर्शक ठरणारे असतात, तर काही विचार समकालीन परिस्थिती व प्रश्न यांच्यापुरते मर्यादित असतात. जसजशी परिस्थिती बदलते, नवीन समस्या पुढे येतात, तसतसे हे (समकालीन संदर्भांना धरून असणारे) विचार त्यांना पुरवणी जोडून पुढे न्यावे लागतात किंवा त्यांना मुरड घालावी लागते. या दृष्टिकोणातून विचार केला तर असे दिसून येईल की, नियोजनाविषयी नेहरूंचे विचार व त्यांची अंमलबजावणी ही दोन्ही कालसापेक्ष असल्याने त्यांना परिपूर्ण म्हणता येत नाही. पण भारतापुढील आव्हानांना तोंड देण्यात समर्थ असणारी आणि आपण जो मार्ग चोखाळू तो बरोबर आहे असा धीर देणारी दुसरी एखादी विचारप्रणाली आपल्यापाशी नाही.

(२)

नियोजनासंबंधीचे आपले विचार व कल्पना नेहरूंनी वेळोवेळी लोकांसमोर मांडल्या होत्या. पहिल्या तीन पंचवार्षिक योजनांचे मसुदे संसदेपुढे मांडताना केलेली भाषणे; १९४८ व १९५६ साली औद्योगिक धोरणावर संसदेत चर्चा चालू असताना केलेली भाषणे; राष्ट्रीय विकास परिषद (नॅशनल डेव्हलपमेंट कौन्सिल) या व्यासपीठावरून त्यांनी महत्त्वाच्या प्रसंगी केलेली भाषणे आणि निरनिराळ्या स्वरूपांच्या सभांसमोर त्यांनी मांडलेले विचार यांतून भारताच्या विकासाच्या वाटचालीबद्दलची

* हा लेख श्री. सिंघ यांनी १९६७ साली लिहिला होता पण तो १९७२ साली प्रसिद्ध झालेल्या पुस्तकात प्रसिद्ध झाला, याचा उल्लेख पूर्वी आलेलाच आहे.

अनुक्रमणिका

अमेरिकेशी वा अन्य कुणाशी असलेले हितसंबंध उजेडात यायचे व जगाला वाटायचे की भारत त्या देशाकडे कलला आहे, त्या देशाभोवती फिरतो आहे. पण वस्तुस्थिती अशी होती की, भारत स्वतःभोवतीच फिरत होता.





अनुक्रमणिका

ग्रंथवेध :

# भारत-पाकिस्तान आणि काश्मिर
# सहा हजार दिवस

श्री. मा. भावे

जवाहरलाल नेहरू यांची पंतप्रधान म्हणून सुमारे सहा हजार दिवसांची कारकिर्द झाली. पहिले पंतप्रधान म्हणून नेहरूंची ही राजवट भारताच्या भवितव्यावर दूरगामी व मूलभूत परिणाम करणारी ठरली. सुरुवातीच्या काळात भारताच्या राज्यघटनेची निर्मिती झाली. घटनेप्रमाणे देशाचा कारभार २६ जानेवारी १९५० पासून सुरू झाला. भारत हे सार्वभौम, लोकशाही, प्रजासत्ताक राष्ट्र आहे, अशी भारतीय नागरिकांनी स्वतःशीच घोषणा केली. घटनेने नागरिकांना काही पायाभूत अधिकार ठरवून दिले व त्यांच्या संरक्षणाची ग्वाही देणारे सर्वोच्च न्यायालय निर्माण केले. त्याचबरोबर देशाच्या सरकारने कोणती उद्दिष्टे डोळ्यापुढे ठेवून कारभार करावा, हे सांगणारी मार्गदर्शक तत्त्वे घालून दिली. राष्ट्राची उभारणी जास्तीत तत्त्वशुद्ध रीतीने व्हावी, याची काळजी घटनाकर्त्यांनी घेतली होती.

देशाची आर्थिक स्थिती डबघाईला आली होती. दारिद्र्य, अन्नधान्याचे दुर्भिक्ष, बेकारी, अनारोग्य, निरक्षरता व अज्ञान अशा अनेक व्याधींनी प्रजा त्रस्त होती. दुसरे महायुद्ध नुकतेच संपले होते. युद्धाच्या काळात उद्योगधंद्यांना तेजी आली होती. युद्धापूर्वी घसरलेले वस्तूंचे भाव चढले होते. नोकऱ्याही उपलब्ध झाल्या होत्या. युद्ध संपल्यानंतर मंदीचे राज्य अवतरले होते. पण तेजी-मंदीच्या चढ-उतारापलीकडे असणारे भयावह वास्तव होते ते सततच्या दारिद्र्याचे. या दारुण परिस्थितीला तोंड देण्यासाठी नियोजनबद्ध विकासाचे सूत्र नेहरूंनी उचलून धरले. नियोजन मंडळाची स्थापना केली. शेतीसाठी पाणीपुरवठा व्हावा म्हणून मोठी धरणे बांधणे, अवजड उद्योगधंद्यांची उभारणी करणे, वीजनिर्मिती करणे, कोळसा व धातू-उद्योग वाढवणे असे उपाय नियोजन मंडळाने आखले.

स्वातंत्र्य चळवळीच्या काळात परराष्ट्रीय घडामोडींशी आपला काही संबंध नाही; आम्ही स्वबळावर व अहिंसक मार्गाने साम्राज्यशाहीशी लढू, अशी चळवळीतील बहुतेक नेत्यांची वृत्ती होती. पण जवाहरलाल नेहरूंनी मात्र परदेशांतील स्वातंत्र्यवादी चळवळींशी संबंध राखला होता. हिंदुस्थानातील स्वातंत्र्याची चळवळ ही साम्राज्यशाहीच्या विरोधात जागतिक स्तरावरील जो लढा चालत आला आहे त्याचाच भाग आहे, असा दृष्टिकोण मांडून त्यांनी स्वातंत्र्याच्या चळवळीला आंतरराष्ट्रीय परिमाण दिले होते. १९२७ साली त्यांनी सोव्हिएट युनियनला भेट देऊन तेथील नियोजनबद्ध विकासाची माहिती करून घेतली होती; इतकेच नव्हे तर कम्युनिस्ट चळवळीत साम्राज्यवाद व भांडवलशाहीविरोधी विचारांचा मोठा भाग होता, त्याची ओळख करून घेतली होती. स्वातंत्र्य मिळण्यापूर्वीच अंतरिम सरकारात उपाध्यक्ष म्हणून काम करीत असताना त्यांनी दिल्लीला आशियाई राष्ट्रांची परिषद भरवून आशियातील राष्ट्रवादी चळवळीत बंधुभाव निर्माण करण्याचा प्रयत्न केला होता.

इंग्रजांनी 'भारतीय स्वातंत्र्याचा कायदा' केला, तेव्हा त्यांनी ह्या भागातील संस्थानांवर असलेले इंग्रजांचे सार्वभौमत्व संपुष्टात आणले आणि संस्थानिक आपल्या ताब्यातील भूप्रदेश व जनता यांचे भवितव्य ठरविण्यासाठी मुखत्यार झाले. आपली संस्थाने स्वतंत्र ठेवावीत किंवा भारत व पाकिस्तान या ज्या दोन सत्ता इंग्रजी राज्याच्या वारस म्हणून उदयाला आल्या होत्या त्यांच्यापैकी कोणत्या तरी भूप्रदेशात विलीन करावीत, असे पर्याय या संस्थानांपुढे होते. बहुतेक संस्थानिकांनी स्वतंत्र राहणेच पसंत केले असते. पण संस्थानी प्रजेच्या उठावापासून संरक्षण करण्याची जबाबदारी इंग्रज सरकारने सार्वभौम म्हणून स्वीकारली होती, तशी जबाबदारी उचलण्यास नवी सरकारे बांधील नव्हती. त्यामुळे व्यवहारतः संस्थानिकांपुढे एकच पर्याय होता की, भारत-पाकिस्तान यांपैकी कोणत्या तरी देशात विलीन व्हावयाचे. हा एक फार मोठा प्रश्न संस्थानिक व दोन्ही देशांचे राज्यकर्ते यांच्या समोर

अनुक्रमणिका

स्वातंत्र्याच्या सकाळीच उभा राहिला होता. शिवाय फाळणीमुळे उद्भवलेले तात्कालिक प्रश्नही होतेच. इंग्रज सरकारच्या मालमत्तेची वाटणी करावयाची होती. सैन्याची विभागणी होणार होती. ब्रिटिश सैन्यातील बहुतेक उच्चाधिकारी इंग्रज होते. त्यामुळे सुरुवातीला दोन्ही देशांचे सेनापती इंग्रजच राहणार होते. ब्रिटिश सनदी अधिकाऱ्यांच्या भवितव्याचा प्रश्न होता. अशा तपशिलाच्या अनेक गुंतागुंती होत्या. त्यांची सोडवणूक महत्त्वाची होती.

या सर्व बाबतींत शासनप्रमुख या नात्याने नेहरूंनी जे निर्णय घेतले, त्यांचे परिणाम पुढची पन्नास-साठ वर्षे तरी अनुभवाला येणार होते. म्हणूनच नेहरूंच्या कारकिर्दीचे पुनःपुनः मूल्यमापन करणे अगत्याचे ठरते. नेहरूंच्या कारभाराचे बहुशः दोषैक दृष्टीने परीक्षण करणारा एक ग्रंथ अमिया राव व बी. जी. राव या दंपतीने १९७४ साली लिहिला.त्याचे नाव 'सिक्स थाउजंड डेज्.' अतिशय सखोल अभ्यास करून व आपल्या बहुतेक विधानांना सज्जड आधार देऊन त्यांनी हा ग्रंथ सिद्धीस नेला आहे. श्री. राव हे सनदी अधिकारी होते व श्रीमती राव या संशोधन संस्थेत काम करीत होत्या. नेहरूंविषयी अनेक पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत; पण आधारग्रंथ म्हणून 'सिक्स थाउजंड डेज्' या पुस्तकाचा उल्लेख क्वचितच येतो. .

या पुस्तकातील ११ वे प्रकरण 'FLESH OF OUR FLESH' या शीर्षकाचे आहे. त्यात 'भारत, पाकिस्तान व काश्मिर' यांच्यातील संबंधांचा विचार केला असून काश्मिरच्या बाबतीत नेहरूंनी मौंटबॅटन व शेख अब्दुल्ला यांच्या प्रभावाखाली येऊन घेतलेले निर्णय भारताच्या हितसंबंधांना दीर्घकालीन बाधा आणणारे कसे ठरले, याचे समग्र व तपशीलवार विवेचन केले आहे. हा लेख त्या प्रकरणातील माहितीवरून लिहिला आहे.

(१)

जवाहरलाल नेहरूंना काश्मिरविषयी अतोनात ममत्व वाटत असे आणि आपण काश्मिरी आहोत याचा त्यांना फार अभिमान वाटत होता. घटना समितीत व पुढे कायदेमंडळात काश्मिरचा विषय चर्चेला येई, तेव्हा "मी आता पंतप्रधान म्हणून नव्हे, तर काश्मिरी मनुष्य म्हणून बोलत आहे", असे ते आवर्जून सांगत असत. १९४७ च्या ऑक्टोबरमध्ये काश्मिरवर 'टोळीवाल्यां' नी हल्ला केला, तेव्हा नेहरू अस्वस्थ झाले होते. त्या वेळी ते घटना-समितीत म्हणाले होते, "काश्मिरातल्या कोणत्याही घटनेमुळे काश्मिर संकटात सापडते आहे असे मला वाटले, तर माझे हृदय दुभंगेल अशी मला भीती वाटते. काश्मिरच्या सुखदुःखांत माझी इतकी भावनिक व वैयक्तिक गुंतवणूक झाली आहे."

हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचा कायदा झाल्यानंतर, वर म्हटल्याप्रमाणे, सर्वच संस्थानिकांसमोर आपण भारतात विलीन व्हायचे की पाकिस्तानात, असा प्रश्न उभा राहिला व काश्मिरच्या संबंधात तर हा प्रश्न फारच बिकट होता. मुस्लिम लीग व जिना असे धरूनच चालले होते की, काश्मिर पाकिस्ताननेच आहे. कारण, काश्मिरमध्ये मुसलमानांची बहुसंख्या होती. काश्मिरचे बाहेरच्या जगाशी जे दळणवळण चाले, त्याचे मार्ग पाकिस्तानातून जात होते. जिनांनी काश्मिरचे महाराजे हरिसिंग यांना वारंवार दिलासा दिला होता की, "काश्मिरचे राजे या नात्याने काश्मिरचे भवितव्य तुमच्या हाती आहे. पाकिस्तानात विलीन व्हा. तुमचे सर्व हितसंबंध सुरक्षित राहतील."

तथापि, महाराजे हरिसिंग यांना पाकिस्तानविषयी विश्वास वाटत नव्हता. 'पाकिस्तानात विलीन होणे म्हणजे आपल्या राजघराण्याचा अंत करून घेणे आणि संस्थानातील हिंदू व शीख यांचा नायनाट होणे होय', असे त्यांचे मत होते. हरिसिंगांच्या घराण्याचे नातेसंबंध, साहजिकपणेच, भारतातील हिंदू घराण्यांशी झालेले होते. असे असले तरी भारतात काश्मिर विलीन करावे याबद्दलही त्यांचा ठाम निश्चय होत नव्हता. नेहरूंनी गेल्या दहा वर्षांत जी भाषणे केली होती व ज्या हालचाली चालविल्या होत्या, त्यामुळे नेहरूंच्या नेतृत्वाखालील सरकारकडून आपल्याला सन्मानाची वागणूक मिळेल, अशी त्यांना खात्री वाटत नव्हती. त्या काळी काँग्रेसने 'ऑल इंडिया स्टेट्स पीपल्स कॉन्फरन्स' नावाची संघटना सुरू केली होती व नेहरू तिचे नेते होते. नेहरूंना सर्वच संस्थानिकांविषयी तुच्छता वाटत असे. सर्व संस्थानिक हे 'प्रतिगामी, अकार्यक्षम आणि अमर्याद हुकूमशाही सत्ता उपभोगणारे' आहेत, असे नेहरूंचे मत होते. १९४६ साली काश्मिरमध्ये

संस्थानिकाच्या विरोधात शेख अब्दुल्लांच्या नेतृत्वाखाली हिंसक निदर्शने झाली होती. ती मोडून काढण्यासाठी सैन्याचा उपयोग करावा लागला. त्या काळात नेहरूंनी संस्थानाच्या कारभाराच्या विरोधात अतिशय जहाल भाषा वापरली होती. (त्या वेळी केलेली विधाने त्यांना नंतर मागे घ्यावी लागली होती.) तेव्हा सरदार पटेलांनी मात्र महाराजांची समजूत काढण्याचा प्रयत्न केला होता. त्यांनी लिहिले होते, "पंडित नेहरू काश्मिरचे आहेत. ते तुमचे शत्रुत्व कधीच करणार नाहीत." पण हरिसिंगांना भारताविषयीही विश्वास वाटत नव्हता; आणि 'हिंदुस्थानच्या स्वातंत्र्या' च्या कायद्याने संस्थानिकांना दिलेला 'संपूर्ण स्वातंत्र्या' चा तिसरा पर्याय स्वीकारण्याकडे त्यांचा कल होता. अशा या संभ्रान्त अवस्थेत त्यांनी भारत व पाकिस्तान या दोन्ही देशांशी 'जैसे थे' (स्टॅण्ड स्टिल) करार करून काळ काढण्याचा प्रयत्न सुरू ठेवला.

जिना मात्र काश्मिरच्या पाकिस्तानात विलीन होण्याविषयी अधीर झाले होते. त्यांनी पश्चिम पंजाबातून काश्मिरला होणारा रसदीचा पुरवठा रोखून धरला, तसेच जम्मू प्रांताच्या पश्चिम भागात बंडाळी सुरू करण्यासाठी चिथावणी दिली. पण या उद्योगाचे परिणाम वेगळेच झाले. हरिसिंगांनी भारताकडे मदतीसाठी विनंती केली. नेहरूंनीही तातडीने मदत पुरविली. त्यांनी एक लष्करी अधिकारी काश्मिरी सैन्याचे आधिपत्य करण्यासाठी पाठविला व काश्मिरचा भारताशी तार, दूरध्वनी व रेडिओ यांच्याद्वारे संपर्क राहील, अशी व्यवस्था केली. त्याच वेळी नेहरूंनी असा आग्रह धरला की, संस्थानाच्या कैदेत असणाऱ्या शेख अब्दुल्लांना महाराजांनी सोडावे.

सप्टेंबर १९४७ मध्ये नेहरूंकडे अशा बातम्या येऊ लागल्या की, टोळीवाल्या पठाणांना मदत करून त्यांच्या करवी काश्मिरवर हल्ला होईल असे कारस्थान पाकिस्तान रचत आहे. आपल्याला मिळालेली ही माहिती त्यांनी पटेलांना सांगितली होती. पण ह्याबद्दल त्यांनी पाकिस्तान सरकारकडे विचारणा मात्र केली नाही. तशी तक्रार करणारे पत्र भारताने पाकिस्तानकडे त्याच वेळी पाठवले असते, तर पुढे 'यूनो' त जी वादावादी झाली तेव्हा त्या पत्राचा उपयोग झाला असता.

आपण वर पाहिलेच आहे की, पाकिस्तानने जम्मूच्या पश्चिमेला – पूंछ विभागात – बंडाळी माजविली होती. तसेच शेख अब्दुल्ला यांच्या नॅशनल कॉन्फरन्सने महाराजांविरुद्ध चळवळ सुरू केली होती, त्या वेळी महाराजांनी शेख अब्दुल्ला यांना कैदेत ठेवले होते. नेहरूंना शेख अब्दुल्ला यांच्याविषयी परम मैत्री वाटत असे. ते निधर्मी वृत्तीचे, लोकशाहीसाठी लढणारे व पुरोगामी विचारांचे नेते आहेत, असा त्यांचा विश्वास होता. १९४६ साली महाराजांनी शेख अब्दुल्ला यांना अटक केली, तेव्हा नेहरूंनी शेख यांच्या सुटकेसाठी सत्याग्रह करून स्वतःला अटक करवून घेतली होती. १९४७ च्या जूनमध्येही शेख अटकेतच होते. त्या वेळी पुनः काश्मिरमध्ये जावे व शेख यांच्यासाठी चळवळ करावी, असे नेहरूंच्या मनात आले. पण मौंटबॅटनने त्यांना थांबवून ठेवले. 'हिंदुस्थानच्या ४० कोटी लोकांची जबाबदारी तुमच्यावर आहे आणि ती दिल्लीत राहिल्यानेच पार पाडता येईल', अशी समज मौंटबॅटनने त्यांना दिली होती. आता, सप्टेंबर १९४७ मध्ये, पूंछ येथील बंडाळी व पठाण टोळीवाल्यांची हल्ले करण्याची तयारी अशी संकटे उभी राहिल्यावर, महाराजा हरिसिंग यांनी शेख अब्दुल्लांची मुक्तता केली. निदान पूंछमधील बंडाळी शमविण्यासाठी अब्दुल्लांचा उपयोग होईल, अशी महाराजांची अपेक्षा होती.

नेहरू आणि भारतातील जाणकार मंडळी यांना वाटत होते की, सुटका होताच शेख हे काश्मिरचे भारतात विलीनीकरण करावे अशी मागणी करतील; पण शेख यांनी उलटीच भूमिका घेतली. "आधी स्वातंत्र्य नंतर विलीनीकरण" अशी घोषणा त्यांनी दिली. ते म्हणाले, "प्रथम काश्मिरमधील सत्ता प्रजेच्या हवाली करा. नंतर लोकांचे प्रतिनिधी 'भारतात विलीन व्हायचे की पाकिस्तानात' याचा निर्णय करतील! माझी नेहरूंशी मैत्री आहे व काँग्रेसने आमच्या लढ्याला मदत केली आहे. पण जर पाकिस्तानात विलीन झाल्याने काश्मिरच्या प्रजेचे हित होईल असे आम्हाला वाटले, तर तसे करण्यास आम्ही मागेपुढे पाहणार नाही."

(२)

इतक्यात टोळीवाल्यांचे लोंढे आलेच! **लूटमार** करीत, आगी लावीत, माणसे मारत, आणि स्त्रियांवर






अत्याचार करीत ते श्रीनगरच्या दिशेने पुढे सरकू लागले. महाराज आणि शेख या दोघांनाही आता शहाणपण सुचले की, भारतीय सैन्य मदतीला आल्याखेरीज काश्मिरचा बचाव होणार नाही. नेहरू ताबडतोब सैन्य पाठवावे अशा मताचे होते. पण मौंटबॅटनने विलीनीकरणाचा आग्रह धरला व सैन्य पाठविणे ४८ तासांनी लांबणीवर पडले. पुढे १९५१ साली व नंतर ५६ साली नेहरूंनी कायदेमंडळात सांगितले होते की, "भारतात काश्मिरने विलीन होणे आणि आम्ही काश्मिरला लष्करी मदत देणे यांचा काहीच संबंध नव्हता. काश्मिरला सैन्य पाठवून वाचवणे हे आमचे कर्तव्य होते." असे जर होते तर मौंटबॅटनच्या विलीनीकरणाच्या आग्रहाला नेहरू का बळी पडले? त्यांनी सप्टेंबर-ऑक्टोबरातच भारतीय सैन्य श्रीनगरला विमानाने पाठवायला हवे होते. २४ ऑक्टोबर १९४७ रोजी टोळीवाले श्रीनगरपासून ३५ मैलांवर होते. तरीही सैन्य पाठविण्याचा निर्णय होत नव्हता. मौंटबॅटनचा युक्तिवाद असा होता की, 'काश्मिर हे अलिप्त किंवा स्वतंत्र राष्ट्र आहे. तेथे आपले सैन्य धाडणे ही फार घातक चूक होईल. आपले सैन्य पाठवले तर पाकिस्तानही सैन्य पाठवेल.(आणि तो आंतरराष्ट्रीय पेचप्रसंग होईल.)' मौंटबॅटनच्या या युक्तिवादाला समर्थक उत्तर १९५२ साली नेहरूंनीच लोकसभेत दिले. ते तेव्हा म्हणाले की, "भारतात किंवा पाकिस्तानात विलीन व्हायचे की नाही, याचा निर्णय काश्मिरने केला नव्हता, एवढ्याने त्या मधल्या काळात काश्मिर स्वतंत्र होते असे म्हणता यायचे नाही." समजा, काश्मिर स्वतंत्र होते असे मानले, तरी एखादे स्वतंत्र राष्ट्र अडचणीच्या वेळी दुसऱ्या देशाकडे मदत मागू शकतेच. स्वतंत्र काश्मिरने भारताकडे लष्करी मदत मागितली व भारताने दिली तर त्यामुळे पाकिस्तानला काश्मिरात सैन्य धाडण्याचा हक्क कसा मिळतो? पण हे उशिरा सुचलेले शहाणपण झाले. ऑक्टोबर १९४७ मध्ये मात्र मौंटबॅटनच्या आग्रहाखातर महाराजा हरिसिंगाकडून विलीनीकरणावर सही आणण्यात दोन दिवस वाया गेले आणि टोळीवाले मोठ्या संख्येने श्रीनगरवर चाल करून आले.

काश्मिरने भारतात विलीन होण्याची जी तयारी दाखविली होती, तिचा स्वीकार करताना मौंटबॅटनने अशी आग्रही भूमिका मांडली की, "काश्मिरच्या प्रजेची (धर्मानुसार) झालेली विभागणी पाहता काश्मिरचे विलीनीकरण करण्यापूर्वी तेथील लोकांची इच्छा विचारात घ्यावी लागेल. त्यासाठी सार्वमत (प्लेबिसाइट) घेणे चांगले." नेहरूंनी या युक्तिवादाला ताबडतोब संमती दिली. विलीनीकरणाला मान्यता देण्याचे पत्र देताना मौंटबॅटनने पुढील कलम घातले– "एखाद्या संस्थानाच्या विलीनीकरणाबाबत तंटा झाला असेल तर त्याचा निवाडा प्रजेची इच्छा विचारात घेऊन करावा असे माझ्या (म्हणजे मौंटबॅटन ज्याचा गव्हर्नर जनरल आहे अशा) सरकारचे धोरण आहे. त्यामुळे माझ्या सरकारची अशी इच्छा आहे की, काश्मिरातील कायदा-सुव्यवस्थेची स्थिती सुधारल्यावर आणि संपूर्ण प्रदेशातून आक्रमकांची हकालपट्टी झाल्यावर विलीनीकरणाच्या प्रश्नाचा निर्णय प्रजेला विचारून करण्यात यावा."

एखादा मुत्सद्दी म्हणाला असता की, 'काश्मिरच्या भारतामध्ये विलीन होण्याबाबत तंटा आहेच कुठे आणि कुणाच्यामध्ये? विलीनीकरणाच्या वेळी, म्हणजे २५ ऑक्टोबर १९४७ या दिवशी पाकिस्तानने विलीनीकरणाला कोणताच आक्षेप घेतला नव्हता. तसेच भारतात विलीन होण्याला काश्मिरी प्रजेची मान्यता नव्हती, असेही म्हणता येत नव्हते. शेख अब्दुल्ला हे काश्मिरी जनतेचे निरपराद नेते होते व त्यांनीही विलीनीकरणाला मान्यता दिली होती. खुद्द जिनांनीही ३१ जुलै १९४७ ला जाहीर केले होते की, "ब्रिटिशांचे सार्वभौमत्व संपल्यावर सर्व संस्थाने स्वतंत्र व मुखत्यार झाली असून भारत वा पाकिस्तानात विलीन व्हावयाचे की स्वतंत्र राहायचे, हे संस्थानांनी ठरवायचे आहे." तेव्हा महाराजांनी स्वेच्छेने विलीनीकरणाच्या कागदपत्रांवर सही केल्यानंतर, जिनांना ती गोष्ट कितीही नापसंत असली तरी, ते त्याबद्दल हरकत घेऊ शकत नव्हते. इतके स्पष्ट असतानाही नेहरूंनी पाकिस्तानच्या पंतप्रधानांना २८ ऑक्टोबर १९४७ रोजी धाडलेल्या तारेत म्हटले होते की, "शांतता व सुव्यवस्था प्रस्थापित झाल्यावर आम्ही आमचे सैन्य काश्मिरातून मागे घेऊ आणि काश्मिरच्या भवितव्याचा निर्णय त्या संस्थानाच्या जनतेवर सोपवू. हे आमचे केवळ आश्वासन नाही तर ते आम्ही तुमच्या सरकारला,

काश्मिरच्या जनतेला व साऱ्या जगाला दिलेले वचनआहे." या तारेमुळे असे झाले की, भारत आणि काश्मिरचे संस्थान यांच्या दरम्यान असलेल्या व्यवहारात एक वादी या नात्याने ढवळाढवळ करण्याचे आमंत्रणच पाकिस्तानला मिळाले. मूळ करारात "माझ्या सरकारची इच्छा आहे की..... प्रजेला विचारून निर्णय करण्यात यावा", असा शब्दप्रयोग असताना या तारेत मात्र "आमचे वचन आहे की" असे सांगण्यात आले. त्यानंतर २ नोव्हेंबर १९४७ रोजी रेडियोवरून केलेल्या भाषणात तर नेहरू आणखी पुढे गेले आणि विलीनीकरणाच्या प्रश्नावर संयुक्त राष्ट्र संघाच्या (यूनो) देखरेखीखाली सार्वमत घेण्याचीही तयारी त्यांनी व्यक्त केली.

हिंदुस्थानाला स्वातंत्र्य देण्याच्या कायद्यानुसार संस्थानाच्या विलीनीकरणाचा निर्णय घ्यायचा पूर्ण अधिकार संस्थानिकाचा होता. प्रजेचे मत विचारात घेण्याला वावच नव्हता. बरे, प्रजेचे मत कसे आजमावयाचे याचेही अनेक पर्याय होते. महाराजा हरिसिंगांनी विलीनीकरणाच्या करारावर सही केल्यानंतर काश्मिर भारतात विधिवत विलीन झाले होते. (१९५२ सालच्या ऑगस्टमध्ये लोकसभेत भाषण करताना नेहरूंनी हे मान्य केले.) समजा, विलीनीकरण सशर्त आहे असे मानले आणि घेतलेल्या सार्वमतात काश्मिरी जनतेने विलीनीकरण मान्य केले नसते, तरी ते विलीनीकरण रद्द करण्याचा अधिकारही फक्त महाराजांचाच होता. सारांश, सार्वमताचे नसते खेंकटे निर्माण करून नेहरूंच्या भाषणाने मुळात झालेल्या विलीनीकरणाच्या कायदेशीरपणाविषयी निष्कारण संशयाचे काहूर उठविले.

त्यानंतर ह्या, मुळात ज्याची जरूरी नव्हती अशा, सार्वमताच्या प्रस्तावाचे जे समर्थन नेहरूंनी केले, ते तर आणखीच धोकादायक होते. ८ नोव्हेंबर १९४७ रोजी पाकिस्तानच्या पंतप्रधानांना पाठवलेल्या तारेत नेहरूंनी म्हटले होते, 'ज्या संस्थानात बहुसंख्य प्रजा एका धर्माची व संस्थानिक वेगळ्या धर्माचा आहे, अशा संस्थानाच्या प्रमुखाने जर आपल्या संस्थानाचे विलीनीकरण प्रजेच्या धर्मापेक्षा वेगळ्या धर्माच्या लोकांची बहुसंख्या असणाऱ्या देशात केले तर, अशा वेळी, संस्थानाच्या प्रजेच्या पुढे ते विलीनीकरण मान्यतेसाठी ठेवले पाहिजे.' याचा अर्थ असा की, भारत हा हिंदूंचा व पाकिस्तान हा मुसलमानांचा देश आहे याला नेहरू आडमार्गाने मान्यता देत होतेच; पण ते याचीही कबुली देत होते की, संस्थानाचे विलीनीकरण प्रजेच्या धर्माच्या आधारावर ठरण्याची शक्यता आहे. म्हणजेच जो धर्माधारित द्विराष्ट्रवाद मुस्लिम लीगने मांडला व ज्याच्या विरोधात काँग्रेस लढली, त्या द्विराष्ट्रवादालाही ते मान्यता देत होते. (कपूरथला ह्या संस्थानाची बहुसंख्य प्रजा मुसलमान होती व संस्थानिक ख्रिस्ती धर्माचा होता. संस्थान भारतात विलीन झाले, तरी तेथे सार्वमताचा प्रश्न उपस्थित झाला नाही.)

थोडक्यात, काश्मिरचे विलीनीकरण आणि त्याला प्रजेकडून घेण्याची मान्यता या विषयांवर नेहरूंनी मौंटबॅटनच्या प्रभावाखाली येऊन इतकी गुंतागुंत घडवून ठेवली की, तीमधून बाहेर कसे पडायचे हेच कोणाला कळेना. त्यामुळे विलीनीकरणाबाबत तंटा उभा करण्याची संधी पाकिस्तानला मिळाली आणि आज सदुसष्ट वर्षांनंतरही हा प्रश्न चिघळतच राहिला आहे.

(३)

इतके सर्व मौंटबॅटनच्या मनाप्रमाणे झाले, तरी मौंटबॅटन काश्मिरात भारतीय सैन्य पाठविण्याला हरकती घेतच होता. त्या वेळी भूदल, नौदल आणि विमानदल या तिन्ही विभागांचे प्रमुख (चीफ्स ऑफ स्टाफ) इंग्रजच होते. भारतीय मंत्रिमंडळाची जी 'संरक्षण समिती' होती, तिचे अध्यक्षपद मौंटबॅटनकडेच होते. आता या चौघांनीही काश्मिरात सैन्य पाठविण्यातून उद्‌भवणाऱ्या धोक्यांची सबब सांगण्यास सुरुवात केली. इथे मात्र नेहरूंनी मौंटबॅटन याला जुमानले नाही. ते म्हणाले की, "सैन्य पाठवले नाही, तर टोळीवाले श्रीनगरचा सत्यानाश करतील आणि भारतात जातीय दंगे भडकतील. श्रीनगरमध्ये दोनेकशे ब्रिटिश रहिवासी आहेत ते मारले जातील." त्यामुळे मौंटबॅटनचा निरुपाय झाला. पण त्याने इंग्लंडमधील सरकारकडून असा हुकूम आणवलाच की, 'भारतीय सैन्यातील कोणाही ब्रिटिश अधिकाऱ्यास या सैन्याबरोबर पाठवू नये.' पुढेही भारताचा गव्हर्नर-जनरल व सैन्याचा सर्वोच्च अधिकारी असणाऱ्या मौंटबॅटनने काश्मिरमधील भारतीय सैन्याला कधी भेट दिली नाही.

भारतीय सैन्य श्रीनगरला पोचले व त्याने






टोळीवाल्यांना परतवले, इतक्यात पाकिस्तानचे गव्हर्नर-जनरल जिना यांनी नेहरू व मौंटबॅटन यांना लाहोरला बोलणी करण्यासाठी आमंत्रण धाडले. पटेलांचा या वाटाघाटींना सक्त विरोध होता. आक्रमक पाकिस्तानला गोंजारण्यात तथ्य नाही, असे त्यांचे मत होते. तथापि, नेहरू वाटाघाटींना जाण्यास तयार होते. जर वाटाघाटींतून शांततेला उपयोगी निर्णय निघणार असेल तर ती संधी दवडू नये, असे त्यांचे मत होते. पण असे झाले की, नेहरू तेव्हा आजारी पडले व मौंटबॅटन एकटाच वाटाघाटींसाठी लाहोरला गेला.

या वाटाघाटीत मौंटबॅटनने असा प्रस्ताव मांडला की, काश्मिरमध्ये संयुक्त राष्ट्रसंघाच्या विद्यमाने सार्वमत घेण्यात यावे. आपण पाहिलेच आहे की, काश्मिरच्या विलीनीकरणाच्या करारात मौंटबॅटनने 'प्रजेचे मत विचारात घेऊ' अशा आशयाचे कलम घातले होते. पण त्यात 'सार्वमत' व 'संयुक्त राष्ट्रसंघ' यांचा उल्लेख नव्हता. मौंटबॅटन लाहोरहून परत आला आणि 'संयुक्त - राष्ट्र-संघाच्या देखरेखीखाली काश्मिरात सार्वमत घ्यावे', ही सूचना त्याने नेहरूंच्या गळी उतरवली. त्या सूचनेला अनुसरूनच नेहरूंनी २ नोव्हेंबर १९४७ रोजी रेडिओवरून व्याख्यान दिले. त्या व्याख्यानाचा उल्लेख मागे आलाच आहे.

त्या वेळी भारत व पाकिस्तान या दोन्ही देशांच्या तिन्ही (भूदल, नौदल, विमानदल) सैन्यविभागांचे प्रमुख ब्रिटिशच होते आणि या दोन्ही देशांच्या सैन्यांवर मिळून एकच सर्वोच्च ब्रिटिश अधिकारी फील्ड मार्शल ऑकिनटोक हा होता. दोन्ही देशांची 'संयुक्त संरक्षण समिती' होती. या समितीच्या बैठकी वेळोवेळी होत. अशा बैठकीत मौंटबॅटनने असा प्रस्ताव मांडला की, 'दोन्ही देशांनी संयुक्तपणे' 'संयुक्तराष्ट्र-संघाला' (संरासं) अशी विनंती करावी की 'संरासं' ने आपल्या देखरेखी-खाली काश्मिरात सार्वमत घ्यावे. यासाठी 'संरासं' ने काश्मिरात एक मंडळ पाठवावे. या मंडळाने सार्वमत योग्य मार्गाने पार पडावे यासाठी भारत, पाकिस्तान व काश्मिर यांच्या सरकारांनी कोणती पावले उचलावीत याची सूचना करावी.' पण मौंटबॅटनचा हा प्रस्ताव पाकिस्तानला अमान्य होता. खरेतर भारताच्या दृष्टीने हा साराच बनाव घातक होता. कारण हा प्रस्ताव मान्य झाला असता तर त्याचा अर्थ काश्मिरचे विलीनीकरण रद्द करण्याची भारताची तयारी आहे व काश्मिरच्या प्रश्नात पाकिस्तानही एक वादी असण्याला भारताची मान्यता आहे, असा झाला असता.

पण 'संरासं'ला काश्मिरच्या प्रश्नात तडजोड करण्यास बोलवावे हा आपला हेका मौंटबॅटनने सोडला नाही. संयुक्त संरक्षण समितीच्या पुढच्या बैठकीत मौंटबॅटनने सूचना केली की, 'भारत-पाकिस्तान यांच्यात मध्यस्थी करण्यासाठी 'संरासं'ला विनंती करावी.' नेहरूंची या सूचनेला संमती नव्हती. त्यांनी विचारले की, ""संरासं'च्या घटनेतील कोणत्या कलमाचा आधार घेऊन आपण ही विनंती करू शकतो? पाकिस्तानचा काश्मिरच्या प्रश्नात संबंधच काय?" गांधीजी व भारताचे मंत्रिमंडळ यांचाही या सूचनेला विरोध होता. पण मौंटबॅटनला नेहरूंच्या स्वभावाचे वर्म माहीत असावे. त्याने नेहरूंचे मन वळवले. नेहरूंनी मंत्रिमंडळाची समजूत घातली. 'संरासं'कडे अर्ज करण्याचा निर्णय आपला होता हे नेहरूंनी वारंवार सांगितले आहे.

'संरासं' कडे त्या संघटनेच्या घटनेतील प्रकरण ६ नुसार किंवा प्रकरण ७ नुसार अर्ज करता येत होता. 'दोन देशांतील विवादाची शांततामय सोडवणूक करावी', असा अर्ज प्रकरण ६ प्रमाणे करता येतो. याउलट, एखाद्या ठिकाणी शांततेला धोका निर्माण झाला असेल, शांततेचा भंग झाला असेल किंवा आक्रमण झाले असेल, तर 'संरासं'च्या सुरक्षा परिषदेने (सेक्युरिटी कौन्सिल) कोणती कृती करावी ते प्रकरण ७ मध्ये सांगितले आहे. जर भारताची अशी धारणा होती की, काश्मिर हा भारताचा भाग आहे व त्यावर पाकिस्तानने आक्रमण केले आहे, तर भारताने प्रकरण ७ चा आधार घेऊन तक्रार करावयास हवी होती. पण भारताने 'संरासं'कडे अर्ज केला तो प्रकरण ६ चा आधार घेऊन! परिणाम असा झाला की, आक्रमक पाकिस्तान व आक्रमणाचा बळी झालेला भारत हे एकाच पायरीवर आले व काश्मिर हे दोघांतील भांडणाचा विषय ठरले.

या अर्जात 'संरासं'ला अशी विनंती केली होती की, 'आपल्या मुल्की किंवा लष्करी कर्मचाऱ्यांनी जम्मू

व काश्मिरवर होत असलेल्या आक्रमणात भाग घेऊ नये किंवा आक्रमकांना मदत करू नये अशी ताकीद पाकिस्तान सरकारने आपल्या कर्मचाऱ्यांना द्यावी, अशी सूचना संरासंने पाकिस्तानला करावी. तसेच पाकिस्तानने काश्मिरवरील आक्रमकांना आपल्या (पक्षी : पाकिस्तानच्या) मुलखाचा उपयोग करू देऊ नये; त्यांना लष्करी व इतर सामग्री पुरवू नये; ज्यामुळे सध्याचा झगडा लांबेल अशी कोणतीही मदत हल्लेखोराना करू नये.' अर्जात पुढे असेही म्हटले होते की, 'जर हल्लेखोरांना मदत करण्याचे पाकिस्तानने थांबवले नाही तर स्वसंरक्षणार्थ पाकिस्तानात घुसून हल्लेखोरांवर लष्करी कारवाई करणे भारताला भाग पडेल.' प्रकरण ६ मध्ये 'शांततामय सोडवणूक' करण्याची तरतूद आहे. त्या प्रकरणानुसार अर्ज करताना 'पाकिस्तानात सैन्य घुसविण्याचा' उल्लेख करणे प्रशस्त नव्हते. त्यामुळे सुरक्षा परिषदेतील सभासदांना, 'भारत धमकीची अंतिमोत्तराची (अल्टिमेटम्) भाषा वापरत आहे', असा वहीम घ्यायला सवड मिळाली.

मुळात भारताने 'संरासं'कडे अर्ज केला तो चुकीच्या प्रकरणाचा आधार घेऊन; आणि त्यानंतर नेहरूंनी गोपालस्वामी अय्यंगार या चुकीच्या मनुष्याची नेमणूक भारताची बाजू सुरक्षा समितीपुढे मांडण्यासाठी केली. अय्यंगार यांच्या ठिकाणी आपला युक्तिवाद मवाळ शब्दांत आणि आर्जवीपणे मांडण्याची खुबी नव्हती. हिंदुस्थानला स्वातंत्र्य देण्याच्या कायद्याला धरून काश्मिर भारतात विलीन झाले आहे; त्यामुळे काश्मिरचे विलीनीकरण विधिवत व निरपराद आहे, या मुद्द्यावर भर न देता त्यांनी भारतसरकारने ज्या उदात्त तत्त्वांच्या आधारे आणि उदार मुत्सद्देगिरीचा अवलंब करून आपले धोरण आखले आहे, त्याचेच गोडवे गायले. भारताने स्वतःहून सार्वमताची तयारी दाखवली हे त्यांनी पुनःपुनः सांगितले. पण अशी तयारी दाखविल्याने विलीनीकरणाच्या कायदेशीरपणाला बाधा पोचत नाही, हे सांगण्याचे टाळले. त्यामुळे सुरक्षा परिषदेच्या सभासदांची अशी समजूत झाली की, सार्वमत विलीनीकरणाच्या विरुद्ध गेल्यास विलीनीकरण रद्द होईल. अय्यंगार यांनी एकदाही पाकिस्तानी आक्रमणाचा उल्लेख केला नाही; उलट, पाकिस्तान आणि घूसखोर टोळीवाले यांच्यातील भेद दाखविण्यात बरेच वक्तृत्व वाया घालवले.

भारताचे जे शिष्टमंडळ सुरक्षा परिषदेपुढे भारताची बाजू मांडायला पाठवले होते, त्यात शेख अब्दुल्ला हेही एक सभासद होते. त्यांची भाषणे आक्रमक व आक्रस्ताळी होती. "मी काश्मिरमध्ये ज्या अधिकारपदावर आहे, तेथून मला हलविण्यास जगातील कोणतीही शक्ती समर्थ नाही", अशी भाषा त्यांनी वापरली.

काश्मिरचा प्रश्न आपण 'संरासं'कडे नेला याचा पश्चात्ताप नेहरूंनी अनेकदा व्यक्त केला. मौंटबॅटनने बादशहाला कळविले की, "'संरासं'मध्ये नीतीपेक्षा दादागिरीलाच महत्त्व आले आहे, असे नेहरू (माझ्यापाशी) म्हणाले. (काश्मिरप्रश्नाचा) विचार प्रश्नाशी संबंधित मुद्द्यांच्या साधकबाधकतेवर होत नसून पाकिस्तानला भारतावर कुरघोडी करायला अवसर देण्याच्या इच्छेने होत आहे,अशी त्यांची तक्रार होती. त्यांचा असाही दावा होता की, (ब्रिटिरा प्रतिनिधी) नोएल ब्रोकर हा (अमेरिकन प्रतिनिधी) वॉरन ऑस्टिन याच्या- इतकाच भारतविरोधी आहे. मी त्यांची समजूत काढण्याचा भरपूर प्रयत्न केला व सांगितले की, सुरक्षा परिषदेत नीतीच्या निकषावर या प्रश्नाचा विचार करणारे प्रतिनिधीही आहेत." त्या वेळी नेहरू इतक्या निकरावर आले होते की, सुरक्षापरिषदेपुढे भारताची बाजू मांडण्यासाठी पाठविलेले शिष्टमंडळ परत बोलवावे, असा त्यांचा विचार होता. पण, नेहमीप्रमाणे मौंटबॅटनशी झालेल्या चर्चेनंतर नेहरूंनी आपला विचार बदलला.

सुरक्षा परिषदेत ही वादावादी चालली असताना काश्मिरात भारतीय सैन्याने टोळीवाल्यांना पाठलाग रेटीत नेले होते. आता पाकिस्तानने आपले सैन्य लढाईत उतरवले होते; पण त्या सैन्यालाही भारतीय लष्कराने चांगलेच पाणी पाजले. ३० मे १९४५ रोजी नेहरूंनी पटेलांना लिहिले की, 'आठवड्याभरात आपले सैन्य डोमेल व मुझफ्फराबाद (ही गावे) जिंकून घेईल.' खरेतर भारतीय सैन्याची आगेकूच याहूनही वेगाने झाली असती. पण भूदलाचे दिल्लीतील मुख्य कार्यालय ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या हातात होते. त्यांनी श्रीनगरमधील भूदल विभागाला पुरेशी मदत न केल्याने भारतीय सैन्याला आडकाठी निर्माण झाली. डोमले व मुझफ्फराबाद ही दोन्ही ठिकाणे पाकिस्तानच्या सीमेवर होती आणि सामारिक महत्त्वाची

अनुक्रमणिका

होती. पण भारतीय सेनेतील ब्रिटिश उच्चाधिकारी, भारत-पाकिस्तानी संयुक्त सैन्याचा प्रमुख ऑकिनटोक आणि मुख्य म्हणजे मौंटबॅटन यांची अशी इच्छाच नव्हती की, काश्मिरातून पाकिस्तानी सैन्याची पुरती हकालपट्टी व्हावी. मुळात फाळणी करताना ब्रिटिशांचे धोरण असे होते की, रशियाच्या दक्षिणेकडील विस्तारवादाला पाकिस्तानच्या रूपाने अडथळा निर्माण व्हावा. काश्मिर पाकिस्तानात विलीन होणार हे त्यांनी गृहीतच धरले होते. काश्मिर हे जागतिक शक्तींच्या ओढाताणीतले भौगोलिक महत्त्वाचे ठिकाण होते. ते पाकिस्तानच्या ताब्यात असणेच ब्रिटिशांच्या दृष्टीने सोयीचे होते. पण त्या सर्वच बेताला पाकिस्तानने काश्मिरवर केलेल्या हल्ल्याने खीळ बसली होती. अशा अडचणीतूनही मार्ग काढीत भारतीय सैन्याने, नोव्हेंबर १९४८ मध्ये, पाकिस्तानने पूंछला घातलेला वेढा उठवला आणि कारगिलमधून पाकिस्तानला माघार घ्यायला लावली. यानंतर नेहरूंनी भारतीय सैन्यातील ब्रिटिश अधिकाऱ्यांना निरोप दिला व जानेवारी १९४९ मध्ये पहिल्या भारतीय भूदल-प्रमुखाची नेमणूक केली.

सुरक्षा परिषदेने मे १९४८ मध्ये एक लवाद-मंडळ भारतात पाठवले. जवळजवळ सहा महिने त्या लवाद-मंडळाने शिष्टाई केली. भारतीय सैन्याने पाकिस्तानी सैन्याला कारगिलमधून आणि पूंछमधून माघार घ्यायला लावली होती. त्यामुळे आता पाकिस्तानला युद्धबंदी करार व्हावा, असे वाटू लागले होते. दरम्यान इतरही महत्त्वाच्या घटना घडल्या होत्या. पाकिस्तानचे गव्हर्नर-जनरल व राष्ट्रपिता जिना यांचा मृत्यू झाला होता. हैदराबाद भारतात विलीन झाले होते. पाकिस्तानी लष्कराच्या अधिकाऱ्यांनी पाकिस्तान सरकारला इशारा दिला होता की, युद्ध चालू ठेवले तर पाकिस्तानचा जबरदस्त पराभव होईल. खरेतर भारताला या वेळी युद्धबंदी स्वीकारण्याची काहीच गरज नव्हती. "आणखी थोडे दिवस युद्ध सुरू राहिले असते तर आमच्या वरचढ सैन्याने त्यांना (जम्मू-काश्मिरमधून) पिटाळून दिले असते", असे नेहरूंनी ७ जुलै १९६१ रोजी श्रीनगरला केलेल्या भाषणात म्हटले आहे. पण नेहरूंच्या दृष्टीने शांतता ही सर्वोच्च गरज असल्याने भारत व पाकिस्तान या दोघांनीही १ जानेवारी १९४९ रोजी युद्धबंदी करार केला.

(४)

सुरक्षा परिषदेची तीन उद्दिष्टे होती : युद्धबंदी घडवून आणणे; जम्मू-काश्मिरमधून भारत व पाकिस्तान यांनी आपापली सैन्ये काढून घ्यावीत अशी योजना करणे; आणि नंतर सार्वमत घेणे. त्यांपैकी युद्धबंदी तर अमलात आली. मार्च १९४९ मध्ये सुरक्षा परिषदेने अॅड्मिरल निमिट्झ् यांना सार्वमत-अधिकारी म्हणून नेमलेही. परंतु, सैन्ये काढून घेणे मात्र आजवर प्रत्यक्षात आले नाही. सैन्ये काढून घेण्याच्या प्रश्नावर भारत व पाकिस्तान यांच्या अनेकदा वाटाघाटी झाल्या, संरासंने मध्यस्थी करण्यासाठी डिक्सन व ग्रॅहॅम यांच्या अध्यक्षतेखालील लवाद-मंडळे पाठवली. पण काहीच निष्पन्न झाले नाही.

१९५४ साली पाकिस्तान व अमेरिका यांच्यात संरक्षण करार झाला. तेव्हा नेहरूंनी संसदेत जाहीर केले की, 'आजवर काश्मिरातून सैन्ये काढून घेण्याविषयी समझोता झाला नाही. आता परिस्थितीने निराळेच वळण घेतले आहे. युद्धबंदी रेषेच्या पलीकडे बाहेरून फार मोठे बळ उभे करण्यात येत आहे.' (१ मार्च १९५४). तरीही 'सर्व शर्ती पूर्ण झाल्या तर काश्मिरात सार्वमत घेण्यास आपण तयार आहोत', असे नेहरू वारंवार म्हणतच राहिले. याच काळात, पाकिस्तानशी वाटाघाटी होत असताना, युद्धबंदी रेषेची सीमा धरून काश्मिरची फाळणी करण्याची तयारीही नेहरूंनी दाखवली होती.

१९५५ या वर्षाच्या अखेरीला सोव्हिएट यूनियनचे नेते क्रुश्चेव्ह व बुल्गानिन भारताला भेट देऊन गेले व त्यांनी जाहीरपणे सांगितले की, 'काश्मिर हा भारताचा भाग आहे.' आता सुरक्षा-परिषदेत भारताला खात्रीचा पाठीराखा मिळाला. २९ मार्च १९५६ रोजी नेहरूंनी भारतीय संसदेत जाहीर केले की, "परिस्थिती जसजशी स्थिरावत जाते तसतशी काही वर्षांपूर्वी ठरविलेली योजना, तेव्हा ती कितीही तर्कशुद्ध वाटली असली तरी, अमलात आणणे कठीण होते. ज्या गोष्टी कायदा, घटना व व्यवहार यांच्या दृष्टिकोणातून पक्क्या होऊन गेल्या आहेत, त्यांना उलथून टाकता येत नाही." नंतर घेतलेल्या पत्रकार-परिषदेत (३ एप्रिल १९५६) नेहरूंनी स्पष्ट केले की, 'आता काश्मिरात काही ढवळाढवळ केल्याने प्रश्नाची गुंतागुंत आणखीच वाढेल.' पुढे नोव्हेंबर १९५६ मध्ये










काश्मिरच्या घटना-परिषदेने विलीनीकरणाला मान्यता दिली. तेव्हा कृष्ण मेनन यांनी 'संरासं'मध्ये सांगून टाकले की, "जेव्हा एखादा देकाराचा प्रस्ताव केला जातो तेव्हा त्याच वेळी तो स्वीकारला नाही, तर तो प्रस्ताव रद्द होतो. त्या देकाराची तलवार तुम्ही पिढ्यान् पिढ्या दात्याच्या डोक्यावर टांगती ठेवू शकत नाही." त्यानंतर भारताच्या दृष्टीने सार्वमताचा प्रश्न संपल्यासारखाच झाला.

काश्मिरात सार्वमत घेण्याच्या सापळ्यात नेहरूंनी भारताला विनाकारण अडकवून ठेवले होते. त्या सापळ्यातून काहीशी सुटका होईपर्यंत ९ वर्षे गेली. 'काहीशी सुटका' म्हणण्याचे कारण असे की, 'सार्वमतां'चे वचन पाकिस्तान व जग यांना भारताने दिले होते; ते वचन आता बंधनकारक नाही, असे नेहरूंनी स्पष्ट केले. पण 'सार्वमता'चे वचन काश्मिरी जनतेलाही दिले होते! बरे, सार्वमत घेताना काश्मिरी जनतेला भारतात किंवा पाकिस्तानात विलीनीकरण एवढे दोनच पर्याय देण्यात येणार नव्हते. 'स्वतंत्र राहणे' हा तिसरा पर्यायही ठेवावाच लागणार होता. गोपालस्वामी अय्यंगार यांनी सुरक्षा परिषदेत निःसंदिग्ध शब्दांत सांगितले होते की, "भारताशी झालेल्या विलीनीकरणातून माघार घ्यावी आणि पाकिस्तानात विलीन व्हावे किंवा स्वतंत्र राहून संरासंचे सभासदत्व मागावे ह्या सर्व पर्यायांवर ... निर्णय काश्मिरी जनतेने घ्यावयाचा आहे."

शेख अब्दुल्ला यांनी हे वारंवार स्पष्ट केले होते की, 'स्वतंत्र काश्मिर' हेच त्यांचे ईप्सित होते. एप्रिल १९४९ मध्ये 'स्कॉट्समन' या पत्राला दिलेल्या मुलाखतीत शेख म्हणाले होते, "कोणत्याही देशात विलीन झाल्याने शांतता स्थापन होणार नाही .... संरासंने ज्याची शाश्वती दिली आहे असे स्वतंत्र काश्मिर हीच एकमेव सोडवणूक आहे." (नंतर शेख यांनी सांगितले की, "आपण असे बोललोच नव्हतो!") शेख अब्दुल्ला यांच्यावर नेहरूंचा मोठा भरवसा व भिस्त होती. तथापि गांधीजी व सरदार पटेल यांना मात्र खात्री वाटत होती की, अब्दुल्ला हे शब्दाला जागणारे गृहस्थ नाहीत.

महाराजा हरिसिंगांकडून विलीनीकरणाचा प्रस्ताव आला त्याच वेळी भारताने महाराजांना असा सल्ला दिला होता की, "म्हैसूर संस्थानाच्या धर्तीवर महाराजांनी एक 'आपत्कालीन प्रशासन' स्थापन करावे व शेख अब्दुलांना त्या प्रशासनाचे प्रमुख नेमावे." नेहरूंनी महाराजांना लिहिले होते की, "शेख अब्दुल्ला पंतप्रधान राहतील आणि (सध्याचे पंतप्रधान) महाजन (जे पुढे भारताचे मुख्य न्यायाधीश झाले) हे एक मंत्री म्हणून असतील. महाजन हेच मंत्रिमंडळाचे अध्यक्षपद घेतील. तुम्ही (पक्षी : महाराज) त्या प्रशासनाचे अध्यक्ष राहाल." नेहरूंनी त्याच पत्रात महाराजांना बजावले की, "आपण जे काही करू त्याला शेख यांची संमती असायला हवी; नाहीतर ती कार्यवाही निष्फळ होईल."

यानंतर १० च दिवसांनी गोपालस्वामी अय्यंगार यांनी महाराजांना लिहिले की, "तुम्ही आणि अब्दुल्ला यांच्यामध्ये घटनात्मक बाबीतले तुमचे मुख्य सल्लागार म्हणून श्री. महाजन असावेत हे अब्दुल्लांना मान्य नाही", म्हणून महाजनांना काढून टाकावे. पटेलांना ही कारवाई नामंजूर होती. आपणच म्हैसूर संस्थानाच्या प्रमाणे 'आपत्कालीन प्रशासना'ची सूचना करायची व लगोलग त्या उदाहरणाच्या चौकटीत न बसणारी गोष्ट करायला सांगायची हे पटेलांना पटत नव्हते. पण काश्मिर-मंत्रालय नेहरूंच्या हवाली होते व नेहरूंना वाटत होते की, "अब्दुल्लांनी परिस्थिती समजूतदारपणे हाताळली आहे व महाराजांच्या अडचणींचाही व्यवस्थित विचार केला आहे." यानंतर अब्दुल्ला काश्मिरचे 'सर्वेसर्वा' झाले. त्यानी भारतीय घटनेत काश्मिरला विशेष अधिकार मिळवून घेतले. त्याचबरोबर अतिशय बेबंद कारभार करण्यास सुरुवात केली.

१९५१ साली काश्मिरच्या घटना-समितीच्या निवडणुका झाल्या. पंच्याहत्तर सभासद निवडावयाचे होते. पंचेचाळीस जागा काश्मिर व लडाखसाठी होत्या. त्यापैकी ४३ जागांवर शेख यांच्या 'नॅशनल कॉन्फरन्स' चे उमेदवार बिनविरोध निवडून आले. दोन जागांवर शेखांच्या उमेदवारांविरुद्ध अपक्ष उमेदवार उभे होते. त्यांच्यावर दडपण आणून त्यांना माघार घ्यायला लावण्यात आली अशा रीतीने पंचेचाळीसही जागा 'नॅशनल कॉन्फरन्स'ला निवडणूक न होताच मिळाल्या! जम्मू विभागात 'प्रजा-परिषद' हा प्रबळ विरोधी पक्ष होता. पण या पक्षाच्या १३ उमेदवारांची नामांकने 'थातूरमातूर'



अनुक्रमणिका

कारणांवरून फेटाळून लावण्यात आली. त्यामुळे प्रजापरिषदेने निवडणुकींवर बहिष्कार टाकला. अशा रीतीने जम्मू भागातील तीसही जागा 'नॅशनल कॉन्फरन्स'ला मिळाल्या! घटना समितीतील सर्व जागा नॅशनल कॉन्फरन्सने 'बिनविरोध' जिंकल्या! या सर्व घडामोडींविषयी नेहरूंना तिळमात्रही संशय वाटला नाही. ते म्हणाले, "लोक नॅशनल कॉन्फरन्स व भारत यांना अनुकूल आहेत हेच या निवडणुकांतून दिसून आले आहे." (१९-१०-१९५१).

यानंतर अब्दुल्लांचे काश्मिरवरील वर्चस्व निरंकुश झाले. भारतीय संघराज्यात राहूनही जर आपण पाहिजे तसे करण्यास स्वतंत्र आहोत, तर स्वतंत्र होण्याचे स्वप्न कशाला पाहिजे, असे त्यांना समजून आले. त्यांनी घटना-समितीला विलीनीकरणाला मान्यता देण्याची सूचना केली. 'स्वातंत्र्य हे एक मनोराज्य होते; कारण आक्रमणापासून आपले आपल्यालाच संरक्षण करावे लागले असते', असे ते म्हणाले (५-११-५१). तथापि प्रश्न संरासंसमोर असल्याने घटना-समितीने तसा ठराव लगोलग केला नाही. यानंतर अब्दुल्लांनी काश्मिरसाठी अनेक विशेष सवलती व अधिकार भारतीय संघराज्याकडून मागून घेतले. (उदा., भारतीय सर्वोच्च न्यायालयाच्या अधिकाराला काश्मिरापुरता काही विषयांत आळा घालणे.)

(५)

शेख अब्दुल्लांचे अनेक हट्ट नेहरूंनी वेळोवेळी पुरवले. काश्मिरात युद्धबंदी झाल्यावर अब्दुल्लांनी नेहरूंकडे असा तगादा लावला की, काश्मिरात आता राजेशाही उठली असून प्रजाच आपले निर्णय घेण्यास मुखत्यार आहे अशी प्रजेची खात्री पटली पाहिजे व त्यासाठी सदर-इ-रियासत असणारे महाराजा हरिसिंग यांची उचलबांगडी केली पाहिजे. आपण स्वत: महाराजांना गादीवरून उतरायला सांगणे हे नेहरूंना अवघड वाटू लागले. त्यांनी सरदार पटेल यांना हे घडवून आणावयास सांगितले. पटेलांनी महाराजांचे मन वळवले आणि महाराजांनी 'स्वेच्छे'ने पद सोडले. महाराजांचा कुमार वयातील मुलगा युवराज करणसिंग हे सदर-इ-रियासत झाले. खुद्द पटेलांना हा सर्व बनाव अजिबात पसंत नव्हता.

शेख अब्दुल्लांना कोणत्याही परिस्थितीत दुखवायचे नाही, असा नेहरूंचा ठाम निश्चय होता. त्याचे प्रत्यंतर श्यामाप्रसाद मुखर्जी यांच्या संशयास्पद मृत्यूच्या प्रकरणात लोकांना आले. जम्मू भागातील डोग्रा जातीच्या हिंदू लोकांनी 'प्रजा परिषद' नावाची संघटना स्थापन केली होती. संघटनेचे उद्दिष्ट असे होते की, काश्मिरचे विलीनीकरण पूर्णत्वाला नेऊन काश्मिरला दिलेले विशेष अधिकार रद्द करावेत. किमानपक्षी जम्मू भाग काश्मिरपासून वेगळा करून तो भारतात घ्यावा. प्रजा परिषदेने या मागणीसाठी आंदोलन सुरू केले होते. ते दडपण्यासाठी अब्दुल्लांनी मोठी दडपशाही चालवली होती. प्रजा परिषदेच्या मागणीला भारतीय जनसंघाचा पाठिंबा होता आणि जनसंघाने दिल्लीतही आंदोलन सुरू केले होते. जनसंघाचे अध्यक्ष श्यामाप्रसाद मुखर्जी यांनी जम्मूला जाण्याचा प्रयत्न केला, तेव्हा ८ मे १९५३ रोजी त्यांना अटक करण्यात आली व काश्मिरला नेऊन एका बंगल्यात स्थानबद्ध करून ठेवण्यात आले. त्या स्थानबद्धतेतच २३ जून १९५३ रोजी मुखर्जी मृत्यू पावले. त्यानंतर भारतात टीकेचे मोहोळ उठले व भारत सरकारने स्वीकारलेल्या दुबळेपणाचा निषेध होऊ लागला. पश्चिम बंगालचे मुख्यमंत्री डॉ. बिधनचंद्र रॉय यांनीही एक कडक शब्दांतील तार अब्दुल्लांना पाठविण्यासाठी भारत सरकारकडे पाठवली. त्यात राय यांनी म्हटले होते की, "मी मुखर्जींचा वैद्यकीय सल्लागार होतो. त्यांना काय आजार झाला होता, त्याची माहिती काश्मिर सरकारने मला द्यायला हवी होती." अब्दुल्लांनी या तारेची अजिबात दखल घेतली नाही. मुखर्जींच्या मृत्यूची चौकशी करावी, ही मागणीही नेहरूंनी मान्य केली नाही.

या वेळेला काश्मिरची घटना समिती करावयाच्या घटनेची पायाभूत तत्त्वे नक्की करण्याच्या कामास लागली होती. भारत व काश्मिर यांच्या परस्परसंबंधांचा निश्चित खुलासा होण्यासाठी भारताशी काही लेखी करार व्हावयास हवा होता. त्याबद्दलचा एक तर्जुमा आधी तयार करण्यात आला अब्दुल्लांच्या सहकाऱ्यांपैकी बक्षी गुलाम अहमद व सादिक यांना तर्जुमा मान्य होता. पण अब्दुल्ला यांना काही मुद्द्यांवर नाराजी वाटत होती. पण अखेर अब्दुल्ला व त्यांचे सहकारी दिल्लीला आले व त्यांनी 'दिल्ली-

समझोत्या' वर सह्या केल्या. नंतर घटनेची पायाभूत तत्त्वे निश्चित करण्याची वेळ आली तेव्हा अब्दुल्ला एका बाजूला व बक्षी, बेग, सादिक इत्यादी सहकारी विरुद्ध बाजूला अशी दुफळी स्पष्ट झाली. नंतर अब्दुल्लांनी आपल्याला विरोध करणाऱ्या नेत्यांवर कुरघोड्या करण्यास सुरुवात केली. थोड्याच काळात या तंट्याला नेहरूंचा गट (म्हणजे बक्षी इ.) विरुद्ध अब्दुल्ला असे रूप आले.

प्रजा परिषदेच्या आंदोलनाचे निमित्त करुन अब्दुल्ला भारतविरोधी व हिंदूंच्या विरोधात जहाल भाषणे करू लागले. आपल्या विरोधी गटातील एक मंत्री श्यामलाल सराफ यांना अब्दुल्लांनी राजीनामा द्यायला सांगितले. सराफांनी त्यास नकार दिला. बाकीचे मंत्री बक्षी, सादिक, डोग्रा, धर यांनी सराफांची बाजू घेतली. आता अशी स्थिती आली की, अब्दुल्लांचा पक्ष 'नॅशनल कॉन्फरन्स', 'काश्मिरची घटना समिती' आणि मंत्रिमंडळ या तिन्ही ठिकाणी शेख अब्दुल्ला अल्पमतात गेले. अशा वेळी अब्दुल्लांना एकच पर्याय उरला. तो म्हणजे सदर-ए-रियासत करणसिंग यांचे उच्चाटन करून स्वत: काश्मिरचे हुकूमशहा बनवायाचे. पण भारतीय सैन्य काश्मिरात असल्याने ते शक्य नव्हते. तेव्हा अब्दुल्लांनी पाकिस्तानशी संधान साधले. आता मात्र नेहरूंना अब्दुल्लांना सांभाळून घेणे अशक्य झाले. शेख तन्मर्ग या गावी पाकिस्तानच्या दूतांची गुप्त भेट घ्यायला गेले असता ९ ऑगस्ट १९५३ रोजी त्यांना अटक करण्यात आली व त्याच वेळी बक्षी गुलाम अहमद यांना काश्मिरच्या पंतप्रधानपदाची शपथ सदर-ए-रियासत यांनी दिली.

यापुढे १९६३ पर्यंत बक्षी यांनी काश्मिरवर राज्य केले. त्यांची राजवट भारताशी निष्ठा ठेवून राहिली. पण ती भ्रष्टाचाराने लिडबिडलेली होती.

सारांश, प्रथम मौंटबॅटन व नंतर शेख अब्दुल्ला यांच्या आग्रहाला बळी पडून नेहरूंनी काश्मिरच्या बाबतीत असे निर्णय घेतले की, त्यामुळे भारत निरनिराळ्या अडचणींत गुंतत गेला.

---

सिक्स थाऊजंड डेज् - अमिया राव व बी. जी. राव. स्टर्लिंग पब्लिशर्स प्रायव्हेट लिमिटेड, न्यू दिल्ली. १९७४.

**टीप :** ऑक्टोबर २०१४ च्या अंकातील 'ग्रंथवेध'मध्ये 'अमृतकण कोवळे' या ग्रंथावर माझा लेख आला आहे. त्यात एक अक्षम्य चूक झाली आहे. माझे ज्येष्ठ व सन्माननीय मित्र कै. प्रा. देवीप्रसाद चट्टोपाध्याय यांचे नाव देवीप्रसाद भट्टाचार्य असे लिहिले आहे. मी फार दिलगीर आहे.

- श्री. मा. भावे

ccc

## लेखकांचा परिचय

 **प्रा. श्री. मा. भावे**

माजी प्रपाठक व विभागप्रमुख, गणित विभाग, नौरोजी वाडिया कॉलेज, पुणे; गणित व तत्त्वज्ञान या विषयांत पीएच. डी. व पदव्युत्तर संशोधन; शिक्षकचळवळीत सहभाग; शिक्षण, गणित व तत्त्वज्ञान या विषयांवर २५ शोधनिबंध.

***पत्ता :–*** ३३/२०, ४ थी गल्ली, प्रभात रोड, पुणे – ४११००४.

दूरध्वनी :- (०२०) २५६७४०९३.

 **डॉ. अंकुश बाळाजी सावंत**

माजी संचालक आफ्रिका अध्ययन केंद्र, मुंबई वि[illegible]पीठ. सद्या आंतरराष्ट्रीय सामरिक व विकास अध्ययन केंद्र, मुंबई या नोंदणीकृत संस्थेचे (NGO) संचा[illegible]क आहेत.

***पत्ता :–*** २०१. प्रियांका अपार्टमेंट, सेंट [illegible] स्ट्रीट, वाकोला, सांताक्रूझ (पूर्व) [illegible]बई ४०००५५.

दू[illegible] :- [illegible] २६६७०२१३.

अनुक्रमणिका

आपल्या ग्रंथालयात अवश्य हवीत अशी

## प्राज्ञपाठशाळा मंडळ ग्रंथमालेची

### संग्राह्य वैचारिक मराठी प्रकाशने

| | सुधारित किंमत २० नोव्हेंबर २००६ पासून लागू |
|---|---|
| ■ वैदिक संस्कृतीचा विकास (तिसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | ३०० रु |
| ■ अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर (पूर्वार्ध) । ब्र. स्वामी केवलानंद सरस्वती | २०० रु |
| ■ पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास । डॉ. सुमंत मुरंजन | १२० रु |
| ■ हिंदी साहित्यविचार । प्रा. प्यारेलाल गोहेल | २५ रु |
| ■ श्री. यशवंतराव चव्हाण अभिनंदन ग्रंथ | ६० रु |
| ■ संशोधन साधना । डॉ. वसंत स. जोशी | ६० रु |
| ■ आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास । ऋग्वेदी | १५० रु |
| ■ वागीश्वरी । डॉ. गो. के. भट | ६० रु |
| ■ गिर्यारोहण परिचय । अच्युत खोडवे | ४० रु |
| ■ इतिहासाचे तत्त्वज्ञान (दुसरी आवृत्ती) । सदाशिव आठवले | १३० रु |
| ■ शाहीर हैबती । डॉ. शिवाजीराव चव्हाण | ४० रु |
| ■ गीताचिकित्सा । भाऊ धर्माधिकारी | १४० रु |
| ■ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी (चरित्र) । सौ. मालती देशपांडे | २५ रु |
| ■ बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार । प. ल. वैद्य | ५० रु |
| ■ हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन (संवर्धित दुसरी आवृत्ती) । मे. पुं. रेगे | १६० रु |
| ■ पाच पुस्तक-परीक्षणे । वा. म. कुलकर्णी | ६० रु |
| ■ भेदविलोपन : एक आकलन । अशोक केळकर | ३० रु |
| ■ कॉलिंगवुडची कलामीमांसा – एक भाष्य । रा. भा. पाटणकर | १०० रु |
| ■ धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार । दि. के. बेडेकर | ३० रु |
| ■ आचार्य शं. द. जावडेकर : व्यक्तित्व आणि विचार | १०० रु |
| ■ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, कार्य आणि विचार | १५० रु |
| ■ इहवाद आणि सर्वधर्मसमभाव । मे. पुं. रेगे | १२० रु |
| ■ प्राज्ञपाठशाळा आणि तिची परंपरा | २०० रु |
| ■ चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान (तृतीयावृत्ती) । सदाशिव आठवले | १०० रु |
| ■ विनोबांची संस्कृत साम्यसूत्रे (रसग्रहणात्मक मराठी अनुवाद) । वसंत नारगोलकर | १२० रु |
| ■ नागरी समाज, राज्यसंस्था आणि लोकतंत्र : भारतीय संदर्भात विवेचन । द. ना. धनागरे | ४० रु |
| ■ प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती (निवडक मौलिक लेखांचा संग्रह) । डॉ. म. अ. मेहेंदळे | ५५० रु |
| ■ हिंदुधर्माची समीक्षा आणि सर्वधर्मसमीक्षा (दुसरी आवृत्ती) : तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | २२५ रु |
| ■ पाश्चात्त्य नीतिशास्त्राचा इतिहास (दुसरी आवृत्ती) : प्रा. मे. पुं. रेगे | १६० रु |

१) ग्रंथालये व संस्थांना किंमतीत १० टक्के सूट. पोस्टेजचा खर्च वेगळा पडेल. २) व्ही. पी. ची पद्धत नाही.
३) पैसे मनिऑर्डरने वा ड्राफ्टने पाठवावेत.

संपर्कासाठी पत्ता : चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२८०३ (जि. सातारा) फोन :(०२१६७)२२०००६

हे मासिक प्रा. यशवंत कळमकर यांनी सन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका

रजिस्टर क्र. 11697/57



हे मासिक प्रा. यशवंत कळमकर यांनी सन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.




अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई